


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)




महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com




# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

# नवभारत

वर्ष १२ वें ] जानेवारी १९६० [ अंक ४

सार-संकलन . . . . . . . .
कै डॉ. अनंत सदाशिव अळतेकर . . . म. म. वा. वि. मिराशी
रियासतकार सरदेसाई . . . . डॉ. व. दि. राव
आधुनिक आर्यभारतीय भाषा आणि
'अंतर्–बहिर्–वर्तुळ' सिद्धांत, . प्रा. गं. ब. ग्रामोपाध्ये
आधुनिक मराठी कवितेंतील वास्तवाचें आकलन . प्रा. रा. ग. जाधव
अनन्ताचा अन्त . . . . श्री. नी. र. वऱ्हाडपाण्डे
वयोवृद्ध महर्षि: बर्ट्रांड रसेल यांचें जीवनकार्य . श्री. बा. रा. मावळंकर
डार्विनचा उत्क्रान्तिवाद सर ज्युलिअन हक्स्ले अनु० शंकर वि. वैद्य.
श्री एकनाथ महाराज व तिरुवेळंदूरचे माधवस्वामी श्री. ना. ब. जोशी
-- पुस्तक – परामर्श –

वार्षिक वर्गणी ९ रु. ] [ किरकोळ अंक १ रु.



## निर्जल कालव्याला "जीवन" प्राप्त झालें

जनतेच्या स्वयंस्फूर्त परिश्रमाना धन्यवाद.

जम्मू व काश्मीरच्या रामहल इलाख्यांतील करना समाज विकास गटाच्या क्षेत्रांमधील साडे सात मैल लांबीचा कालवा बराच काळ दुर्लक्षिला गेल्यामुळें जवळजवळ निरूपयोगी झाला होता.

त्या पंचक्रोशींतील सुमारें ४०० लोकांनीं तो पुन्हां पूर्ववत् चालू करण्याचें मनावर घेतले. त्यांनीं कालव्यांतील गाळ काढून टाकला; त्याचें पात्र रुंद केले; कडेला उंच बांध घातले; पाण्यासाठीं उतार बनविले व प्रवाहाला अडथळा करणारे खडक आणि गारगोटे दूर केले. आतां त्यांच्या भागांत अनेक खेड्यांच्या जमीनींना कालव्याच्या मुबलक पाण्याचा पुरवठा होत आहे.

स्वावलंबन व स्वयंस्फूर्त परिश्रम यामुळें जीवन अधिक सुखमय बनते व योजनेचीही द्रुत प्रगति होते.

**योजनेस सहाय्य म्हणजे स्वतःस सहाय्य**

DA-59/333







अनुक्रमणिका

प्राज्ञपाठशाळामंडळ वाई, यांचें मासिक

# नवभारत

वर्ष तेरावें
अंक चौथा

जानेवारी
१९६०

संपादक-मंडळ
आचार्य स. ज. भागवत–श्री. हरि कृष्ण मोहनी–प्रा. वि. म. बेडेकर
प्रा. गोवर्धन पारीख का. संपादक

| | | |
|---|---|---|
| सार-संकलन | | १–९ |
| कै. डॉ. अनंत सदाशिव अळतेकर | म. म. वा. वि. मिराशी | १०–१५ |
| रियासतकार सरदेसाई | डॉ. व. दि. राव | १६–१८ |
| आधुनिक आर्यभारतीय भाषा – आणि 'अंतर्-बहिर्-वर्तुळ' सिद्धांत, | प्रा. गं. ब. ग्रामोपाध्ये | १९–२५ |
| आधुनिक मराठी कवितेंतील – वास्तवाचें आकलन | प्रा. रा. ग. जाधव | २६–३३ |
| अनन्ताचा अन्त | श्री. नी. र. वऱ्हाडपाण्डे | ३४–३९ |
| वयोवृद्ध महर्षि: बर्ट्रंड रसेल यांचें जीवनकार्य | श्री. बा. रा. मावळंकर | ४०–४८ |
| डार्विनचा उत्क्रान्तिवाद | सर ज्युलिअन हक्स्ले अनु० शंकर वि. वैद्य. | ४९–५४ |
| श्री एकनाथ महाराज व – तिरुवेळंदूरचे माधवस्वामी | श्री. ना. ब. जोशी | ५५–५९ |
| पुस्तक – परामर्श | | ६०–६३ |

वार्षिक रु. ९ सहामाही रु. ५ अंकास रु. १

हें मासिक श्री. म. शं. साठे यांनीं दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथें छापून प्रा. वि. म. बेडेकर यांनीं प्राज्ञपाठशाळामंडळ वाई यांचेंकरितां तेथेंच प्रसिद्ध केलें.

पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, 'नवभारत' मासिक,
'गणेश भुवन' २७६, तेलंग रोड, माटुंगा–मुंबई १९
२ व्यवस्थापकी : व्यवस्थापक, 'नवभारत' मासिक,
C/o प्राज्ञ प्रेस, वाई ( द. सातारा )

# सार-संकलन

## भारत-चीन कलह : एक दृष्टिकोण

भारत-चीन कलहासंबंधीं, ऑक्सफर्डच्या सेंट् ॲंटनी कॉलेजांतील अतिपूर्वेच्या राजकारणाचे तज्ञ, श्री. जी. एफ्. हड्सन् यांचा एक लेख दि न्यू लीडर या साप्ताहिकांत नुकताच प्रसिद्ध झाला आहे. वंशिक दृष्ट्या तिबेटन असलेला सर्व मुलुख ताब्यांत घेऊन तिबेट चीनमध्यें पुरेपुर सामील करून घेणें हा चीनच्या धोरणाचा हेतु आहे असें हड्सन् यांचें म्हणणें आहे. त्यांच्या लेखाचा थोडक्यांत गोषवारा येथें देत आहोंत.

तिबेटला आपल्या चिनी मातृभूमीपासून अलग करणें हें ब्रिटिश साम्राज्यवाद्यांचें धोरण होतें असा चीनकरवीं अधिकृत प्रचार केला जातो. परंतु हें ऐतिहासिक सत्याला धरून नाहीं. चीनशीं झालेला व्यापारी करार तिबेट अंमलांत आणीना व त्याला तसें करावयास भाग पाडणें चीनला शक्य नव्हतें. यामुळें १९०४ ची तिबेटवरील "चढाई" झाली हें प्रसिद्ध आहे. १९१२ सालीं तिबेटनें चीनचें आक्रमण झुगारून दिल्यानंतर एकूण सीमाविषयक परिस्थितींत स्पष्टता यावी म्हणून चीन व तिबेटच्या प्रतिनिधींना सिमला येथें पाचारण करण्यांत आलें. या त्रिपक्ष परिषदेंत संमत झालेल्या करारानुसार ल्हासा सहित "आउटर तिबेट"चा प्रदेश हा चीनच्या आधिपत्याखालीं स्वायत्त राष्ट्र म्हणून रहावा आणि आसामच्या उत्तरेस भारत व तिबेट यांतील सीमा मॅक्-मोहन रेषा ही असावी. तिबेट व ब्रिटन यांनीं या कराराला जुलै १९१४ त मान्यता दिली. चीननें मान्यता देण्याचें नाकारलें. तथापि या सीमेपलिकडील प्रदेशांत चीनचा अधिकार मुळीं नव्हताच. यामुळें त्याच्या संमतीचा प्रश्नहि महत्त्वाचा नव्हता. शिवाय, तिबेट व भारत यांच्यामधील या सीमांतर्गत बराच मुलुख रानटी टोळयांनीं व्यापलेला होता. आंतरराष्ट्रीय कायद्यानुसार सीमा निश्चित करणें आवश्यक असल्यानें हा करार करण्यांत आला व तो आवश्यक होता.

भारतांत ब्रिटिश सत्ता असेतोपर्यंत या मॅक-मोहन रेषेचा प्रश्न कधींच निघाला नाहीं. तिबेटला ही सीमा मान्य होती; व चीन तिच्याबद्दल कांहींच करूं शकत नव्हता. तथापि तिबेटला कायदेशीर मान्यता ब्रिटननें दिली नाहीं. तसें केलें असतें तर १९५१ सालचें चीनचें आक्रमण संयुक्त राष्ट्रसंघटनेला विचारांत घेतां आलें असतें. ब्रिटिशांच्या या भूमिकेचा वारसा मिळाल्यानें भारताला 'तिबेट हा चीनचाच भाग होय, भारत-तिबेट सीमा ही भारत-चीन सीमा आहे' या म्हणण्याला संमति देणें भाग पडलें. नंतर मॅक्मोहन रेषेच्या दक्षिणेकडील सुमारें वीस हजार चौरस मैलाचा भारतीय प्रदेश हा चीनचा भाग असल्याचें दर्शवणारे नकाशे चीननें प्रसिद्ध केले. यामुळें मैत्रीचे संबंध असूनहि भारतांत चिंतेचें वातावरण निर्माण झालें. भारतीय निषेधाला प्रथम "हे नकाशे कोमिंटांगच्या राजवटींत प्रसिद्ध झालेले असून नंतर ते बदलण्यास सवड झाली नाहीं," असें उडवाउडवीचें उत्तर चीननें दिलें. तथापि नंतरहि त्यांत दुरुस्ती करण्यांत आली नाहीं. यामुळें हा प्रश्न उकरून काढण्यासाठीं योग्य संधीची चीन वाट पहात असावा असें अनुमान काढणें शक्य होतें.

मॅक्मोहन रेषेच्या उत्तरेस खांबा टोळीच्या बंडाचा बंदोबस्त करण्याच्या निमित्तानें ही संधी चीननें घेतली. या भागांत चीनचें बरेंच सैन्य गोळा झालें. तिबेटवरील आक्रमणाबाबतच्या भारतीय प्रतिक्रिये-







मुळें चीन-भारत संबंधहि बिघडले. व पुढें मॅक्मोहन रेषेच्या दक्षिणेकडील भारतीय प्रदेशांत चिनी सैन्य कित्येक ठिकाणीं घुसलें, व त्यांनीं लोंगजु हें भारतीय ठाणें काबीज केलें. व चीननें निषेधाला उत्तर देतांना " भारतानेंच उलट आगळीक केली आहे; मॅक्मोहन रेषा चीननें मान्य केलेली नव्हती, सीमेचा पुनः विचार करणें आवश्यक आहे " अशी भूमिका घेतली. " लहानसहान फेरबदल करायचे हा प्रश्न वेगळा, परंतु एरवीं एवढा मोठा टापू भारत चीनला कधीच देणार नाहीं, मॅक्मोहन रेषा हीच भौगोलिक दृष्टीनें व प्रघात म्हणूनहि योग्य सीमा होय, " असें यावर नेहरूंनीं उत्तर दिलें.

लोंगजुबद्दल भारतीय संसदेंत चर्चा होत असतांना लडाखच्या ईशान्य भागांतून सिकियांगपासून तिबेट-पर्यंत एक लष्करी रस्ता चीननें भारतीय हद्दींतून बांधला असल्याचा उल्लेख करण्यांत आला. या संबंधीं खुलासा करतांना त्या भागांत भारतीय अधिकारी नाहींत, तेथें लोकवस्ती नाहीं असें नेहरू म्हणाले. हा रस्ता भारताच्या परवानगीनें बांधला गेला काय असा प्रश्न होता. या भागांत काय चाललें आहे याची भारताला कल्पना नसेल असें संभवनीय वाटत नाहीं. चीनशीं मैत्री कायम राखावी म्हणून नेहरू व संरक्षणमंत्री श्री. मेनन यांनीं तिकडे दुर्लक्ष केलें असणें शक्य आहे. ल्हासामधील चिनी अधिकाऱ्यांच्या भाषणांवरून लडाखच्या सीमेवरील आक्रमण ही सबंध लडाख गिळंकृत करण्याची नांदीच होय असें वाटतें. केवळ तिबेटच नव्हे तर तिबेटन लोकवस्तीच्या व लामां-वर श्रद्धा ठेवणाऱ्या दक्षिण व पश्चिमेकडील इतर सर्व प्रदेशावर कबजा या प्रदेशांतील राष्ट्रीय जागृ-तीचीं बीजें नष्ट होणार नाहींत अशी चीनची कल्पना दिसते. यासाठीं लडाख, तिबेटनवस्तीचा नेपाळचा भाग, सिक्कीम व भूतान हे सारे प्रदेश ताब्यांत घेण्याचा चीनचा हेतु असावा.

भारतीय राष्ट्रीय भावनेला विरोध प्रवृत्त करण्यास अशा प्रकारें चीननें उद्युक्त कां व्हावें ? याचें मुख्य कारण म्हणजे आजची चिनी राजवट ही राष्ट्रीय भावनेवरहि आधारलेली आहे; केवळ सामाजिक सिद्धांतावरच नव्हे आणि पक्षाच्या आर्थिक धोरणाचा सामान्य जनतेवर ताण पडत असल्यानें देशभक्तीचा डंका वाजवणें त्यांना भाग आहे. ' साम्राज्य-वाद्यांच्या डावपेंचामुळें ' गमावलेला एक भाग आपण तिबेट जिंकून परत मिळवला आहे. यामुळें चीननें संमति न दिलेल्या सरहद्दीचा पुनर्विचार करणें आवश्यक झालें आहे, ही भूमिका यांतून निर्माण झाली आहे. यांतून भारताशीं कलह निर्माण झाल्यास चीनला त्याची फारशी दिक्कत वाटत नाहीं. शिवाय पाकिस्तानशीं असलेले भारताचे संबंध— ध्यानांत घेतां भारत सरहद्दीचें संरक्षण करूं शकणार नाहीं अशी चीनची श्रद्धा आहे. चीन थोडाबहुत संयमानें वागत आहे याचें कारण भारतविरोधी धोरणास पाठिंबा देण्यास सोविएट तयार नाहीं हें होय. म्हणून आपल्या मुळांतील मागणीला मुरड न घालतां तूर्त लष्करी आगळीक करण्याचें चीन कदा-चित टाळीलहि. ही मागणी आतां स्पष्ट रूपानें कागदोपत्रीं नमूद झालेली आहेच.

## पाकिस्तानी प्रतिक्रिया

" पाकिस्तान रिव्ह्यू " हें पाकिस्तानमधील अत्यंत महत्त्वाचें मासिक पत्र आहे. त्याच्या आक्टोबर १९५९ च्या अंकांत भारत-पाकिस्तान संबंधांची चर्चा करतांना व नुकत्याच निघालेल्या, पाकिस्तानचे अध्यक्ष जनरल आयुब व पं. नेहरू यांच्या पालम-विमानतळावरील चर्चेनंतरच्या, संयुक्त पत्रकाचा परामर्श घेतांना संपादकांनीं पुढील विचार प्रकट केले आहेत :

" या संयुक्त पत्रकाचें खरें महत्त्व त्यांत व्यक्त झालेल्या भावनांत नसून तें भारत-चीन सरहद्दीवरील कलहावर अवलंबून आहे. भारत-पाक संबंध सुधार-







ण्याबद्दलचा आशावाद आपण बराच सावधगिरीनें बाळगला पाहिजे. या संयुक्त पत्रकांत प्रत्यक्षांत आहेत त्यापेक्षां अधिक मैत्रीचा संभव पहाणें हानीकारक ठरेल. भारतांत ताठरपणाऐवजी आपणासंबंधीं कांहींसें लवचिक धोरण घेतलें जात आहे; याचें कारण भारताचा हृदयपालट होत आहे हें नसून भारतीय सरहद्दीवर अनपेक्षितरीत्या सुरू झालेला कलह हें होय. या कलहानें निर्माण झालेलें सुरवातीचें घबराटाचें वातावरण निवळतांच भारत पुन: मूळपदावर जात असल्याचीं चिन्हें दिसत आहेत. याचा एक पुरावा म्हणजे ता. १ सप्टेंबरच्या आयुब-नेहरू चर्चेची कुद्रतुल्लाशहाब यांनीं प्रसिद्ध केलेली हकीकत नेहरूंनीं लागलीच नाकारली हा होय. त्याबरोबरच निवडणूक मंडळ व वरिष्ठ न्यायालय यांचें अधिकारक्षेत्र जम्मू-काश्मीरला लागू करून काश्मीर भारतांत सामील करून घेण्याच्या दिशेनें भारतानें आणखी एक पाऊल पुढें टाकलें आहे. सोविएट मध्यस्थीनें चीनशीं समझोता होण्याची शक्यता निर्माण होतांच भारत पाकिस्तानबद्दल पुनः ताठरतेची भूमिका घेऊं लागला आहे असें यावरून दिसतें. म्हणून खोटी आशा उराशीं बाळगून आपण स्वतःची फसवणूक करून घेतां कामा नये. भारताशीं मैत्री काश्मीरला स्वयंनिर्णयाचा हक्क मिळाल्यानेंच अर्थपूर्ण होऊं शकते. एरवीं ती एक अर्थशून्य कल्पना आहे."

## आधुनिक जगांतील भाषांतराचें स्थान

"गेलीं दोनशें वर्षें सुधारलेलें जग एका भाषेंतील ग्रंथ इतर सर्व भाषांत भाषांतरित करण्यांत शक्तीचा अपव्यय करीत आहे." चिनी संस्कृतीचे व्यासंगी अभ्यासक व भाषांतरकार जॉर्ज मॉर्गोली यांच्या वरील विधानांत भाषांतराविषयीचा एक सामान्य दृष्टिकोण आढळतो. उलट १९५६ सालीं जगांतील निरनिराळ्या राष्ट्रांत २७६१७ ग्रंथांचीं भाषांतरें प्रसिद्ध झाल्याचें युनेस्कोच्या तद्विषयक सूचीवरून दिसून येतें; व ही माहिती सुमारें शंभर देशांपैकीं अवघ्या बावन्न देशापुरतीच मर्यादित आहे; व त्यांतहि ती अपुरीच आहे. शिवाय, प्रत्यक्ष प्रसिद्ध झालेल्या ग्रंथावरून भाषांतरकार्याची अंशतःच कल्पना येऊं शकते. राजकीय, औद्योगिक, व्यापारी, वृत्तपत्रीय इत्यादि क्षेत्रांत खाजगी वा मर्यादित उपयोगासाठीं केल्याजाणाऱ्या भाषांतरांचें प्रमाण त्याहून कितीतरी अधिक आहे. तसेंच शेंकडों आंतरराष्ट्रीय संघटना व त्यांचीं मुखपत्रें, निरनिराळ्या जागतिक परिषदा व अन्य सभा-संमेलनें, चलच्चित्रपट इत्यादि अनेक कार्यांच्या अनुषंगानेंहि भाषांतरें सतत होत असतात.

तथापि हीं केवळ महत्त्वाचीं कार्यक्षेत्रें झालीं; वास्तविक पहातां आज एकहि मानवी कार्यक्षेत्र असें नाहीं कीं जेथें भाषांतराची गरज वाटत नाहीं; क्रय—विक्रय, यंत्रोत्पादन वा शास्त्रीय समस्यांची चर्चा इत्यादि क्षेत्रांत भाषांतराची गरज अपरिहार्य वाटते. गेल्या पंचवीस वर्षांच्या काळांत फ्रान्समध्यें भाषांतरित ग्रंथांची संख्या दुप्पट झाली आहे; झेकोस्लोवाकियांत तर हें प्रमाण चौपटीनें वाढलें आहे. पॅरिसच्या रंगभूमीवर येणाऱ्या परदेशीय नाटकांचें प्रमाण याच काळांत तिप्पट झालें आहे. पन्नास वर्षांपूर्वीं फारच थोडया जागतिक परिषदा होत व त्यांत भाषांतराला स्थान नसे. आतां अनेक निरनिराळ्या भाषांच्या व भाषांतराच्या उपयोगावर आधारलेलें नवें आंतरराष्ट्रीय जीवनच उदयास आलें आहे.

या प्रश्नाची दुसरीहि एक बाजू आहे. युरोपीय पुनरुज्जीवनाची चळवळ (रेनेसान्स) होईपर्यंत जगांत एकच खरी भाषा आहे, इतर सर्व भाषा हीं तिचींच थोडी बहुत भ्रष्ट रूपें होत असा तेथें समज होता. आणि भाषांतर म्हणजे प्राचीन ग्रीक वा लॅटिन ग्रंथांतील विचार विविध प्रादेशिक बोली वा भाषांतून (व्हर्न्याक्युलर) मांडणें होय, असें समजलें जाई. परंतु नंतर या भाषांचा

झपाट्यानें विकास होऊं लागला; आणि केवळ या भाषा व मूळची लॅटिन यांच्यांतच नव्हे तर या विविध भाषांतील पारस्परिक संबंधहि प्रस्थापित करणें आवश्यक झालें. त्याचप्रमाणें लॅटिन व ग्रीक व्यतिरिक्त अन्यत्र देखील तितकाच प्राचीन व संपन्न सांस्कृतिक ठेवा अस्तित्वांत असल्याची जाणीव निर्माण झाली. केवळ भारतांतच शंभराहून अधिक भाषा व बोली आहेत; आणि यांतील निदान सहा भाषा बोलणारांची संख्या दोन कोटींहून अधिक आहे. इतर भाषांतरें बाजूस ठेवलीं तरी केवळ बायबल सोसायटीच्या वतीनें झालेल्या बायबलच्या भाषांतरांची संख्या तेराशेंत्रेपन्न इतकी आहे.

भाषा हें जीवनाचेंच एक अंग होय. साकल्यानें विचार केल्यास कोणतीहि भाषा दुसऱ्या एखाद्या भाषेसारखीच म्हणावयास हरकत नाहीं ही जाणीव आतां सामान्य माणसास होऊं लागली आहे. हा अत्यंत मूलगामी बदल असून त्याच्या योगानें ऐतिहासिक कालाच्या आरंभापासूनच्या काहीं संवयी नाहींशा होण्याचा संभव निर्माण झाला आहे. सर्व संस्कृतींत विशिष्ट भाषेचा वापर हें मानवीं गटांचें व्यवच्छेदक लक्षण समजलें गेलें आहे. स्लॉव्हो म्हणजे बोलण्याची देणगी ज्याला प्राप्त झाली आहे तो स्लाव्ह; परकीय हे सारे मुकेच होत असा समज स्लाव्ह लोकांत आढळतो. प्राचीन चिनी लोकहि परकी भाषा बोलणें हें रानटीपणाचें लक्षण मानीत असत. आतां मानवजात बहुभाषिक असल्याची जाणीव सर्वांनाच झालेली आहे. यामुळें परकीयांविषयीं संशय व काल्पनिक भीति यांचें ऐवजीं एकमेकांबद्दलचें योग्य आकलन हें महत्वाचें ठरणें आवश्यक झालें आहे. तंत्रविद्येनें मानवाच्या सामर्थ्यांत अतोनात वाढ केली असून सर्व विश्वावर सत्ता गाजवणें त्याला शक्य झालें आहे; यामुळें वर उल्लेखिल्याप्रमाणें आकलनाची व सहानुभूतीपूर्वक जाणिवेची गरज निर्माण झाली आहे. शेकडों वर्षें भाषांतरकार हा मानवाच्या नित्याच्या व्यवहारापासून कांहींसा दूरच उभा होता; तथापि आतां मात्र मानवी प्रश्नांच्या वा जीवनाच्या केंद्रस्थानी तो उभा आहे. जगाची विविध प्रकारची विभागणी करणाऱ्या भिंती आतां कोसळत असून तें प्रत्यही अधिकाधिक लहान होत आहे; अशा वेळीं त्याचें भवितव्य घडविणाऱ्या शिल्पकारांत भाषांतरकाराला महत्वाचें स्थान प्राप्त होणें अपरिहार्य आहे.

भाषांतराला आणखीहि एक बाजू आहे. आमच्या विविध भाषा प्रत्यही जुन्या होत आहेत. रॅबेलेचें आधुनिक फ्रेंचमध्यें भाषांतर होत आहे. "बॅलड ऑफ् रिबँड ऑफ इगॉर" आधुनिक रशियनमध्यें अनुवादित झाला आहे. लवकरच सार्त्र, गॉर्की, फॉकनेर, सेल्मा लॅगरलॉव्ह यांचीहि भाषांतरें करावीं लागतील.

भाषांतरानें लेखनक्षेत्राची क्षमता कमी होण्याऐवजीं दामदुपटीनेंच नव्हे तर शतपटीनें वाढते. छपाईसाठीं बौद्धिक व शारीरिक शक्ति खर्च होते खरी ! परंतु भाषांतराच्या या शोधामुळें एकाच पुस्तकाच्या हजारों प्रती वाचल्या जातात; आणि पूर्वी एकच पुस्तक लिहिलें गेलें असतें त्याऐवजीं हजारों लिहिलीं जातात. ज्ञान सर्वांना उपलब्ध करून देण्याचें मौलिक कार्य भाषांतरामुळें साध्य होतें. अर्न्स्ट रेनॉं यानें म्हटलें आहे कीं, "ज्या ग्रंथाचें भाषांतर झालें नाहीं तो निम्माच प्रसिद्ध झाला आहे असें समजावें." इतकेंच नव्हे तर इतरांशीं संपर्क प्रस्थापित करून भाषांतराचें कार्य संस्कृतीच्या विविध अंगोपांगांना संपन्न बनवतें. कोणत्याहि एका राष्ट्राच्या मर्यादेंत उपलब्ध न होणारी वैचारिक संपदा साहित्य, तत्वज्ञान व विज्ञान यांना भाषांतरामुळ प्राप्त होऊं शकतें. अशा प्रकारें उपलब्ध होणाऱ्या तौलनिक दृष्टिकोणामुळें कोणत्याहि निकोप व जोमदार संस्कृतीस आत्मस्वरूपाचें आकलन होतें; आपलीं वैशिष्ट्यें समजतात. एकरमनशीं झालेल्या चर्चेंत

गटेनें विश्वसाहित्य निर्माण होण्याची शक्यता पाहिली व तिचें स्वागत केलें. विसाव्या शतकांत जग एक झालें असून सर्वांना परस्परावलंबित्वाची जाणीव निर्माण होत आहे. याचा अर्थ अभिव्यक्तीचीं साधनें एक होतील वा सगळे एकाच खालच्या पातळीवर येतील असा नव्हे. राष्ट्रीय भावना व सांस्कृतिक वैशिष्ट्यांची जाणीव आजच्याइतकी पूर्वी कधीच तीव्र नव्हती. तथापि आतां विश्वैक्याच्या जाणीवेचाहि उदय होत असून तिच्यायोगानें आपापली भाषा व परिस्थिती याविषयीची लेखकाची प्रक्रिया बदलणें, नवी होणें अपरिहार्य आहे. भाषांतराला आतां मूलगामी मानवी कार्याचें स्वरूप प्राप्त झालें आहे. आजवर भाषांतरकाराची उपेक्षा झाली. तथापि आतां तो आपल्या हस्तिदंती मनोऱ्यांतून बाहेर पडत असून बाजार, दुकानें, कारखाने, चर्चास्थळें व क्रीडांगणें, सर्वत्र प्रवेश करीत आहे. या सतत प्रवासी जगांत मानवी हृदयांचे सांधे जुळवण्याचें कार्य हें त्याचेंच कार्य आहे. [ युनेस्को–कुरिएवरून ]

## शिक्षणक्षेत्रांतील ‘ द्वैभाषिक ’

भाषिक राज्यांच्या अनुषंगानें विविध घटक राज्यांतील भिन्नभाषिकांच्या संरक्षणाचा प्रश्न गेले कांहीं दिवस प्रामुख्यानें पुढें आला आहे. या संरक्षणाचा शिक्षणक्षेत्राशीं विशेष निकटचा संबंध आहे. हा प्रश्न भारतापुरताच मर्यादित नाहीं. अशा तऱ्हेचा प्रश्न बेल्जियम, हॉलंड, स्वित्सर्लंड, युगोस्लाविया, सोविएट रशियांतील घटक राज्यें इत्यादि ठिकाणींहि आहे. इंग्लंड हेंहि त्याचें एक महत्त्वाचें उदाहरण आहे. इतकेंच नव्हे तर इंग्लिश, रशियन, स्पॅनिश वा फ्रेंच यांसारखी एकच भाषा बोलणाऱ्या राष्ट्रांत देखिल, “ भावी जीवनाच्या गरजा एकाच भाषेनें पूर्ण होऊं शकणार नाहींत; त्याकरितां प्रत्येक सुबुद्ध नागरिकाला स्वभाषेव्यतिरिक्त आणखी एकादी तरी भाषा समजणें आवश्यक आहे ”, अशी जाणीव बळावत आहे. या दृष्टीनें सतत तीन पिढ्यापर्यंत वेल्समध्यें सुरू असलेल्या प्रयत्नांचा उद्बोधक अनुभव सर बेन बॉवेन टॉमस यांनीं युनेस्कोच्या ‘ कुरिए’मध्यें कांहीं दिवसांपूर्वी मांडला होता. त्याचा थोडक्यांत सारांश येथें देत आहोंत :

हें द्वैभाषिकत्व म्हणजे काय ? शक्य तों शाळेंत जाणाऱ्या प्रत्येक विद्यार्थ्याला आपल्या मातृभाषेबरोबरच तो ज्या समाजांत वावरतो त्या समाजाच्या भाषेचें ज्ञान झालें पाहिजे या शैक्षणिक तत्त्वाचा स्वीकार असा याचा अर्थ आहे. हें ज्ञान वयाच्या बाराव्या वर्षांपर्यंत, निदान सक्तीचा शालेय शिक्षणक्रम पुरा होईपर्यंत त्याला होणें आवश्यक आहे. वेल्समध्यें वेल्श ही ऐतिहासिक भाषा आहे, तिला एक हजार वर्षांचा साहित्यिक इतिहास आहे; इंग्लिशच्याहि पूर्वीपासून ती एक निश्चित स्वरूप प्राप्त झालेली व प्रस्थापित भाषा होती. यामुळें शिक्षणकायद्यान्वयें तीन महत्त्वाच्या जबाबदाऱ्या शासनाधिकाऱ्यांवर टाकल्या आहेत.

पहिली जबाबदारी म्हणजे वेल्समधील जनतेच्या शिक्षणाला उत्तेजन देऊन त्याची वाढ करणें ही होय. त्यांचें संस्थात्मक जीवन व विशेषतः त्यांची भाषा संपन्न करण्याचे यत्न केले पाहिजेत. गेल्या पन्नास वर्षांत याबाबतींतल्या जागरूकतेंत मुळींच खंड पडलेला नाहीं हें नमूद केलें पाहिजे. निरनिराळ्या प्रदेशांतील मुलांची त्यांच्या परिस्थित्यनुरूप योग्य काळजी घेतली जावी यासाठीं भाषिक पहाणी करण्यांत आली आहे. शाळांची संघटना व त्यांतील अभ्यासक्रम याविषयींचे प्रश्न शिक्षकांना सोडवितां यावेत यासाठीं अनेक परिषदा व सुटींतले वर्ग घेण्यांत येतात. प्रकाशकांना पाठ्य पुस्तकें तयार करण्यास उत्तेजन दिलें जातें. रेडियोवर वेल्शमधून शालेय कार्यक्रम ठेवले जातात. यामुळें स्थानिक स्वराज्यसंस्थांच्या भाषाविषयक धोरणांत स्पष्टता आली आहे; वेल्श शिकवणारे उत्तम शिक्षक

मोठ्या संख्येनें तयार झाले आहेत; आणि शाळांची संघटना व वर्गातील अध्यापन पद्धती यांच्यांतहि अनेक सुधारणा झाल्या आहेत.

दुसरें महत्त्वाचें काम शिक्षकांच्या 'ट्रेनिंग'चें. वेल्श उत्तम रीतीनें शिकवणाऱ्या व विविध विषय त्या भाषेंतून हाताळूं शकणाऱ्या शिक्षकांचा आरंभीं तुटवडाच होता; आणि असलेले शिक्षक कांहीं वेळां वेल्समध्यें नोकरीस तयार नसत. ट्रेनिंग कॉलेजांनीं हा प्रश्न कांहींसा सोडवला. इतर दोन कॉलेजांतून वेल्शमधून अन्य विषय शिकवण्याचा उपक्रम सुरू झाला. आणि अशा प्रकारें तयार होणाऱ्या "द्वैभाषिक" शिक्षकांच्या नोकरीचा प्रश्न सुटावा म्हणून स्थानिक स्वराज्यसंस्थांना सूचनाहि देण्यांत आल्या आहेत.

तिसरी महत्त्वाची जबाबदारी "मुलांना त्यांच्या आईबापांच्या इच्छेनुसार शिक्षण दिलें पाहिजे" या कायद्यांतील कलमांतून निघाली आहे. वेल्श ही मातृभाषा असलेल्या मुलांसाठीं मिश्र भाषिक वस्तींतून वेल्श शाळा काढण्याची परवानगी गेल्या कांहीं वर्षांपासून देण्यांत येत आहे. स्थानिक शिक्षणाधिकाऱ्यांनीहि या बाबतीत स्वतंत्रपणें व परस्परसहकार्यानें बरीच प्रगति केली आहे. कांहींनीं खास अधिकारी नेमून हा प्रश्न सोडविण्याचा प्रयत्न केला आहे, व पाठ्य पुस्तकांच्या निर्मितीला सहाय्य केलें आहे. कांहींनीं वेल्श शिकवण्याची योग्य तरतूद करतां यावी म्हणून शाळांची पुनर्घटना केली आहे. तसें पाहिल्यास केवळ इंग्लिश किंवा केवळ वेल्श बोलणारांच्या वस्तींत हा प्रश्न साधा व सरळ असतो. प्राथमिक शिक्षण इंग्लिश किंवा वेल्शमधून दिलें जातें व तीनचार वर्षांच्या अभ्यासक्रमानंतर उरलेल्या दुसऱ्या भाषेचा त्यांत समावेश होऊं शकतो. तथापि जेथें लोकवस्ती भाषिक दृष्टीनें अत्यंत संमिश्र स्वरूपाची असेल तेथें अन्य उपाय योजावे लागतात. कांहीं वेळां सर्व मुलांना एकाच शाळेंत प्रवेश देऊन नंतर त्यांचें भाषिक वर्गीकरण केलें जातें, व शाळेचें ऐक्य सामाजिक व धार्मिक कार्यें, समारंभ व खेळ यांच्याद्वारा कायम राखण्यांत येतें. अर्थात् अशा ठिकाणीं क्रीडांगणावरील भाषा ही बहुसंख्यांकांची असते. उलट कांहीं वेळां मोठ्या व व्यापक क्षेत्रांतील भाषिक अल्पसंख्यांकांच्या मुलांना एकत्र आणून त्यांची एकाच शाळेंत भरती केली जाते. यामुळें अनेक शहरें, नगरें वा नागरी वस्तीचीं ठिकाणें येथें आतां वेल्श शाळा सुरू झाल्या आहेत. त्याचप्रमाणें वेल्शमधून ग्रंथनिर्मिती व्हावी यासाठीं स्थानिक शिक्षणशासकांकडून ठराविक रकमा वसूल करण्यांत येऊन दरवर्षी १६००० पौंडांची तरतूद करण्यांत आली आहे. अशा प्रकारें स्थानिक व केंद्रीय शासनांकडून न्याय्य भाषिक धोरण अवलंबिण्याचे प्रयत्न होत आहेत.

अशा प्रकारें वेल्समधील शिक्षण ही एक महत्त्वाची प्रयोगशाळा बनली आहे. तेथील अनुभव केवळ दोन भाषांना शिक्षणांत स्थान देण्याच्या दृष्टीनेंच नव्हे तर भाषेच्या शिक्षणाच्या दृष्टीनें देखील महत्त्वाचा ठरूं पहात आहे.

## भारतीय संरक्षणाचा प्रश्न

"दोन राष्ट्रांमधील सीमा म्हणून एकादी पर्वताची रांग असली कीं निर्माण होणाऱ्या, शेंकडों वर्षें प्रत्ययास आलेल्या, सीमाकलहासारखाच कलह सध्यां भारत व चीन यांच्यांत सुरू आहे. प्रबल राष्ट्रांचें अशा नैसर्गिक सीमेची केवळ आपल्याकडील बाजू ताब्यांत ठेऊन समाधान होत नाहीं; तर आर्थिक, राजकीय व लष्करी दृष्टीनें त्यांस खिंडींच्या पलिकडची दुसरी बाजूहि ताब्यांत ठेवणें आवश्यक वाटतें. यामुळें भूतान, सिकीम, आसाम, व काश्मीरचा कांहीं भाग यांत यापुढें लष्करी चकमकी होणें अगदीं शक्य आहे. तिबेट पादाक्रांत केल्या नंतर चीन स्वस्थ राहीलसें वाटत नाहीं. अशा तऱ्हेची संभाव्यता व्यक्त करून स्विस् लष्करांतील








एक बडे अधिकारी कार्ल ब्रुनर यांनीं भारताच्या राष्ट्रीय संरक्षणप्रश्नावर झुरिकच्या " स्विस् रिव्ह्यू ऑफ् वर्ल्ड अफेअर्स "या मासिकाच्या नोव्हेंबर १९५९ च्या अंकांत एक लेख लिहीला आहे. त्याचा थोडक्यांत सारांश येथें देत आहोंत.

चीननें बांधलेला मार्ग ज्या प्रदेशांतून जातो त्यांत वा काश्मीरच्या अन्य प्रदेशांत चीनचें आणखी एकादें लक्ष्य आहे कीं काय याबद्दल केवळ कल्पनाच केली पाहिजे. पाकिस्तान व भारत यांच्या प्रमुख नेत्यांचीं बोलणीं चिनी आक्रमणानंतर झालीं व पाकिस्तानच्या अध्यक्षांनीं नंतर इराण व विशेषतः अफगाणिस्तानला भेट दिली या घटना महत्त्वाच्या व सूचक होत.

ऑगस्ट १९४७ मध्यें स्वातंत्र्य मिळाल्यानंतर १८४८ मधील स्वित्सर्लंडप्रमाणेंच भारतापुढेंहि अनेक महत्त्वाचे संघटनात्मक व घटनात्मक प्रश्न होते. घटक राज्यांवर संरक्षणाची कितपत जबाबदारी टाकायची आणि नवीन राष्ट्रीय सैन्य उभारायचें कीं नाहीं हा त्यांतील एक प्रश्न होय. भारतांत शांतता राखण्याचें व संरक्षणाचें अशा दोन्ही कार्यांसाठीं ब्रिटिश राजवटींत फक्त १६ बटॅलियन्स इतकें खडें सैन्य पुरत होतें. भारतीय जनता निःशस्त्र असल्यानें व दुसऱ्या महायुद्धांत जपानचें आक्रमण होईपर्यंत बाह्य आक्रमणाची भीति नसल्यानेंच हें शक्य झालें. गरज पडल्यास ब्रिटिशांना भारतीय राजेरजवाड्यांच्या सैन्यावरहि विसंबून रहातां येई.

राष्ट्रीय संरक्षण, तद्विषयक कायदे व संघटना, लष्कराचें शिक्षण व परकीय शत्रूविरुद्ध लष्कराचा वापर या बाबतची सर्व जबाबदारी भारतीय संयुक्त राज्यांत केंद्रीय सरकारवरच टाकण्यांत आली. आणि अंतर्गत कायदा व सुव्यवस्था राखण्यासाठीं आवश्यक इतपतच लष्कर ठेवण्याचा अधिकार संस्थानांना देण्यांत आला. हीं संस्थानें विलीन झाल्यावर त्यांचें वेगळें सैन्यहि नाहींसें झालें. अशा प्रकारें भारतीय संरक्षणाची सर्व जबाबदारी आतां भारतीय लष्कर, हवाईदल व आरमार यांजवरच आहे.

सैन्याच्या या तिन्ही शाखांच्या भिन्न संघटना आहेत. भारतीय हवाई दलांत दुसऱ्या महायुद्धांत प्रत्यक्ष भाग घेतलेल्या वैमानिकांचे एक 'कोअर' असून त्याची पुनर्घटना होत आहे; व नवीं विमानें मिळवण्याचे प्रयत्नहि सुरू आहेत. भारतीय नाविक दल मात्र बारा लहान लहान जहाजांचें बनलेलें असून १४०० मैल लांबीच्या प्रचंड किनाऱ्याचें संरक्षण करण्यास अपुरें आहे. यामुळें या किनाऱ्याच्या रक्षणाची जबाबदारी अंशतः हवाई दलानें स्वीकारावी असें भारतीय लष्करी तज्ञांचें मत आहे. भारत ब्रिटिश राष्ट्रकुलांत राहण्याचें एक कारण ब्रिटिश आरमाराकरवीं मिळणारें संरक्षण हेंहि आहे.

राष्ट्रीय सेना उभारण्याच्या भारताच्या प्रश्नांत तीन कारणांमुळ कांहींशी गुंतागुंत निर्माण झाली. पाकिस्तानच्या निर्मितीमुळें ब्रिटिशांनीं उभारलेल्या संरक्षणकोटाचा एक तृतियांश भाग नाहींसा झाला, त्यांतच काश्मीर व हैद्राबाद प्रकरणांची भर पडली. आणि त्यावर पौंडाचें अवमूल्यन झाल्यानें मोठाच आघात झाला. तथापि या सर्व अडचणींना तोंड देऊनहि भारतानें अगदीं अल्पावधींत पांच लाख सेनेची उभारणी केली आहे. या स्विस् सैन्याएवढ्याच सेनेवर स्वित्सर्लंडच्या शंभरपटीनें मोठ्या प्रदेशाच्या संरक्षणाची जबाबदारी आहे. भारतीय राष्ट्रीय अंदाजपत्रकांतील ६० टक्के खर्च आज राष्ट्रीय संरक्षणावर होत आहे.

सेनेची उभारणी करतांना भारताला पडलेली एक महत्त्वाची अडचण म्हणजे वरच्या हुद्यांवरील नेमणुकींना लायक अधिकाऱ्यांचा तुटवडा ही होय. दुसऱ्या महायुद्धांत देखील जास्तीत जास्त ब्रिगेडियर — जनरलपेक्षां वरिष्ठ हुद्यावर भारतीय अधिकाऱ्यांची ब्रिटिशांनीं नेमणूक केली नाहीं. आणि तेथील










'ब्रिगेड' युरोपीय लष्करांतील 'रेजिमेंट' पेक्षां मोठी नव्हती. 'जनरल स्टाफ'च्या कामाचें शिक्षण भारतीय अधिकाऱ्यांना कधींच मिळालें नाहीं. यामुळें अनेक उत्तम अधिकारी असून वरिष्ठ हुद्यासाठीं लायक भारतीय अधिकारी मिळणें मुष्किल झालें. यामुळें या कामांसाठीं व शिक्षणासाठीं भारतीयांना परकीय--विशेषत: ब्रिटिश अधिकाऱ्यांवर अवलंबून रहावें लागलें. हळुहळु त्यांच्या जागा भारतीय नागरिकांनीं घेतल्या आहेत.

भारतीय सेना, ही सामान्य शिपायापासून सेनापती-पर्यंत, सैनिकाचा पेशा स्वखुषीनें पत्करलेल्यांची कायमची (रेग्युलर) सेना आहे. यामुळें तिचा आकार साहजिकच मर्यादित होतो. आणि सर्व रेग्युलर सेनांप्रमाणेंच तिच्यांतहि अनेक अधिकाऱ्यांना व सैनिकांना शासनकार्य करावें लागतें. मोंगलाच्या काळांपासून चालत आलेली व संस्थानिक व ब्रिटिश यांनीं रक्षिलेली लष्करी परंपरा कायम असल्यानें भारतात लष्करी भरतीस अडचण नाहीं. गांधीवादी परंपरेनेहि ती दुर्बळ झालेली नाहीं. सुमारें तीन पंचमांश सैन्य रजपूत व शिखांचें मिळून बनलें आहे. गुरखे उत्तम शिपाई बनतात; दक्षिण भारतीयांना नाविकदलाचें आकर्षण वाटतें. मराठे तर नेहमींच उत्कृष्ठ शिपाई ठरलेले आहेत. अत्यंत उष्ण प्रदेशांत ते रहात असूनहि त्यांची क्षमता, धैर्य व निष्ठा पश्चिम हिमालयांत प्रस्तुत लेखकानें प्रत्यक्ष अनुभव-लेली आहे.

धार्मिक भेदांचा सैन्याला स्पर्श झालेला नाहीं. 'जवानां'ची वयाच्या १८ व्या वर्षी सहा वर्षांसाठीं प्रथम भरती होते; व ५५ वर्षापर्यंत ते सैन्यांत राहूं शकतात. त्यांचें शिक्षण दोन वर्षेपर्यंत चालू राहातें. व त्यांत पाश्चात्य राष्ट्रांतील प्राथमिक शिक्षणाचाहि भाग आहे. नंतर त्यांचें कार्य पाहून त्या आधारावर एन् सी ओची निवड होते. व एकदोन वर्षेपर्यंत आणखी शिक्षण देऊन नंतर त्यांची "कंपनी" त नेमणुक केली जाते. अधिकारपदासाठीं वयाच्या १६ व्या वर्षी निवड करून तरुणांना स्वतंत्र विद्यालयांत दोनतीन वर्षेपर्यंत शिक्षण दिलें जातें. नेतृत्व व शिक्षण या दृष्टीनें अनेक अनुभवसिद्ध पद्धती व संघटना ब्रिटिशांपासून भारतानें स्वीकारल्या आहेत. केवळ वेष, कवाईत वा अभिवादन पद्धतींतच नव्हे तर संघटनात्मक व स्ट्रॅटेजीचे प्रश्न हाताळण्यांतहि ब्रिटिश पद्धतीचाच प्रभाव दिसून येतो.

भारतीय सेनेची संघटना ध्यानांत घेतली म्हणजे आणीबाणीच्या प्रसंगीं भारताला बारा ते अठरा 'डिव्हिजन्स्' सहज कोठेंहि उभ्या करतां येतीलसें दिसतें. डावपेचांच्या दृष्टीनें त्यांचें महत्व बरेंचसें वहातुकीच्या साधनावर अवलंबून राहील हें उघड आहे. देशाच्या अनेक भागांत पुरेसे लोहमार्ग वा रस्ते नाहींत हें खरें. तथापि ही अडचण असूनहि भारतीय सेना कोठेंहि चटकन् हस्तक्षेप करण्यास समर्थ आहे. काश्मीरमधील हस्तक्षेप हा याचा एक पुरावा आहे.

स्वतंत्र होतांक्षणींच दुसऱ्या महायुद्धांत लिबियाच्या रखरखीत वाळवंटांत वा ब्रह्मदेशांतील जंगलांत लढलेल्या भारतीय सेनेला काश्मीरच्या बर्फाच्छादित पर्वतांत लढावें लागलें. पर्वतांतील लढाईचें सैन्याला शिक्षण देण्याचा वरिष्ठांनीं लागलीच प्रयत्न केला व या कामीं स्वित्सर्लंडची मदत घेतली. स्वित्सर्लंडनें दोन लष्करी तज्ञमंडळें पाठवल्याचें प्रसिद्ध आहे.

१९४९ सालीं भारतसरकारनें प्रादेशिक सेना उभारण्याचा प्रयत्न केला. तथापि चाळीस कोटी लोकसंख्येच्या या विशाल देशांत सक्तीचें लष्करी शिक्षण ही एक अव्यवहार्य कल्पना आहे. यामुळें ही योजना तूर्त बाजूस ठेऊन त्यांनीं निकडीच्या औद्योगिक, आर्थिक, सामाजिक व शैक्षणिक प्रश्नांकडे लक्ष देण्यास सुरवात केली. यामुळें सध्यां तरी





अनुक्रमणिका

भारतीय संरक्षण हें व्यावसायिक लष्कर, नौदल व हवाईदल यांवरच अवलंबून आहे.

भारतीय संरक्षक संघटनेचें एक महत्वाचें वैशिष्ट्य म्हणजे खालपासून वरपर्यंत संघटनात्मक स्पष्टता हें होय. कंपनी–कमांडरपासून सरसेनापतीपर्यंत प्रत्येकाला आपापल्या जबाबदारीची स्पष्ट कल्पना आहे. आणि संरक्षण प्रश्नाचा संकलित विचार करण्यासाठीं शासन, उद्योगधंदे, आर्थिक व्यवहार, विज्ञान इत्यादि क्षेत्रांतील तज्ञांचीं सल्लागारमंडळें आहेत. अशा तऱ्हेनें भारतीय सेनेच्या कार्यपद्धतींत नव्या–जुन्याचा उत्तम मिलाप झाला असून अत्यंत मोठमोठे प्रश्न पुढें असूनहि त्यांनीं संरक्षणाचें हें उत्कृष्ट साधन निर्माण करण्यांत यशस्वी व्हावें ही एक अत्यंत गौरवास्पद गोष्ट होय.

---











# कै. डॉ. अनंत सदाशिव अळतेकर

## जागतिक कीर्तीचा विद्वान हरपला

मरणं प्रकृतिः शरीरिणां
विकृतिर्जीवितमुच्यते बुधैः । —कालिदास

पाटण्याच्या काशीप्रसाद जयस्वाल संशोधन संस्थेचे संचालक डॉ. अ. स. अळतेकर हे गेल्या नोव्हेंबर महिन्याच्या २४ व्या तारखेस रात्रीं आगामी भारतीय इतिहास परिषदेचें अध्यक्षीय भाषण लिहीत असतां एकाएकीं अस्वस्थ झाले आणि लागलीच त्यांना हॉस्पिटलमध्यें नेलें तरी तेथें त्यांची प्रकृति जास्तच बिघडून ता. २५ च्या सकाळीं ते निधन पावले ही बातमी ता. २७ ला सकाळीं वृत्तपत्रांत वाचली तेव्हां तिच्यावर माझा विश्वास बसेना. सुमारें दोन महिन्यांपूर्वी भुवनेश्वर येथें मध्यवर्ती पुरातत्त्व सल्लागार मंडळाच्या सभेकरितां आणि अखिल भारतीय प्राच्य विद्या परिषदेच्या अधिवेशनाकरितां मी त्यांच्या सहवासांत एक आठवडाभर होतों. त्यावेळीं त्यांची प्रकृति उत्कृष्ट होती. डिसेंबरच्या अखेरीस आसामांत गोहत्ती येथें भरणार असलेल्या इतिहास परिषदेंत कोणत्या विषयावर परिसंवाद घडवून आणावयाचा, अध्यक्षीय भाषणांत कोणत्या विवाद्य प्रश्नांची चर्चा करावयाची इत्यादिविषयीं ते आपले विचार सांगत होते, बिहार शासनानें योजिलेल्या मगध देशाच्या इतिहासाचें कार्य कोठवर आलें याची माहिती देत होते आणि भावी कार्याच्या अनेक योजना आंखीत होते. त्या ऐकत असतां त्यांच्यावर काळाचा निर्घृण हल्ला इतक्या लौकर होईल असें कोणास स्वप्नहि पडलें नसतें. अलीकडे भारतांत सर्वसाधारणपणें लोकांची आयुर्मर्यादा वाढत आहे. गेल्या महिन्यांत नागपुरांत सेवानिवृत्त गृहस्थांच्या संस्थेच्या रौप्य महोत्सव साजरा करण्यांत आला. त्यावेळी विविध क्षेत्रांतून सेवानिवृत्त झालेले ऐंशीं वर्षांवर ज्यांचें आयुर्मान आहे असे पंधरा वीस गृहस्थ एकत्र आले होते. अनंतरावाचें वय निधनसमयीं केवळ एकसष्ट वर्षांचें होतें. शिवाय त्यांची प्रकृति उत्तम आणि उत्साह दांडगा दिसत होता. तेव्हां आणखी पंधरा वीस वर्षें तरी ते आपलें आवडतें कार्य करीत राहतील अशी अपेक्षा कोणीहि केली असती. त्यांच्या अकालिक व आकस्मिक निधनानें प्राचीन भारतीय इतिहासाची अपरिमित हानि झाली आहे आणि परिणतप्रज्ञेचा व जागतिक कीर्तीचा संशोधक आपणांतून गेला आहे याबद्दल सर्वांस हळहळ वाटेल.

## सच्छील व धार्मिक घराणें

अनंतरावांचें घराणें मूळचें कोल्हापूरचें. त्यांचा जन्म ३० ऑगष्ट १८९८ रोजीं झाला. त्यांचे वडील सदाशिव खंडो अळतेकर हे कोल्हापुरास वकीली करीत होते. पण संस्थानी वातावरणांत त्यांच्या स्वातंत्र्यप्रिय वृत्तीचा कोंडमारा झाल्यामुळें त्यांना कोल्हापूर सोडावें लागलें. ते अत्यंत सच्छील व धार्मिक प्रवृत्तीचे गृहस्थ होते. आपले मुलगे मिळवते झाल्यावर त्यांनी वानप्रस्थ वृत्तीचा स्वीकार करून समर्थ रामदासांच्या ग्रंथांचा जनतेंत प्रसार करण्यांत आपलें उर्वरित आयुष्य घालविलें. त्यांनी या उद्देशानें 'सुलभ दासबोध', 'समर्थ-रत्नसंग्रह' असे कांहीं ग्रंथ प्रसिद्ध केले आहेत. सुमारें तीस वर्षांपूर्वी ते माझ्या घरीं आले असतां माझ्या लहान मुलानें 'मनाचे श्लोक' म्हटल्यावर प्रसन्न होऊन त्यांनी त्यास 'समर्थरत्न-संग्रहा'ची दिलेली प्रत माझ्या संग्रहीं आहे. आणि तिजवरून त्यांच्या धार्मिक व प्रेमळ स्वभावाची स्मृति मला होत असते.

सदाशिवरावांना दोन पुत्र झाले – गणपतराव व अनतराव. त्यांचें शिक्षण प्रथम कऱ्हाड येथें व नंतर पुण्यास डेक्कन कॉलेजमध्यें झालें. त्या वेळीं मीहि त्याच कॉलेजांत शिकत होतो म्हणून त्यांचा माझा परिचय जवळजवळ पंचेचाळीस वर्षांचा आहे. अनंतरावांचे वडील बंधु श्री. गणपतराव यांनी वकीलीचा पेशा

पतकरून कऱ्हाडास अनेक सामाजिक कार्यांत पुढाकार घेतला. ते कांहीं वर्षे मुंबई विधान सभेचे आणि नंतर लोकसभेचेहि सभासद होते. त्यांनी आपल्या कामगिरीनें चांगलें नांव मिळविलें आहे.

## कॉलेजांतील जीवन

अनंतराव डेक्कन कॉलेजमध्यें आले त्या वेळीं मी त्या कॉलेजांत फेलो होतों. त्यामुळें त्यांच्या त्या काळच्या जीवनाची मला बरीच माहिती आहे. त्या वेळीहि ते आपल्या बुद्धिमत्तेनें चमकत असत. कॉलेजच्या एका पारितोषिकाकरितां स्टीव्हन्सनच्या एका कठीण पुस्तकावर निबंध लिहावयाचा होता. त्या स्पर्धेला बी. ए. चे विद्यार्थीहि बसले होते. पण अनंतराव पहिल्या वर्षाचे विद्यार्थी असतांहि त्यांचा निबंध कॉलेजचे प्रिन्सिपॉल बेन यांस पसंत पडून त्यांनी तें पारितोषिक त्यांस दिलेलें मला आठवतें. त्यावेळीं कांहीं विद्यार्थ्यांना हा अनपेक्षित निकाल प्रि. बेनच्या नैसर्गिक विक्षिप्तपणाचें एक उदाहरण आहे असें वाटलें. पण बेनसाहेबांस बुद्धिमत्तेची चांगली पारख होती. अनंतरावांच्या नंतरच्या कामगिरीने तो निकाल यथायोग्य होता हें सिद्ध झालें आहे.

डेक्कन कॉलेजमधून अनंतराव सव परीक्षा पहिल्या वर्गांत पास होऊन फेलो म्हणून नेमले गेले. त्या काळीं एम्. ए. च्या परीक्षेकरितां संस्कृत विषयांतील एक पेपर ऐच्छिक विषयावर असे. बहुतेक विद्यार्थी त्याकरितां वेदान्त हा विषय निवडीत असत. पण त्या काळींहि अनंतरावांना प्राचीन भारतीय इतिहासाची गोडी लागल्यामुळें त्यांनी तो विषय घेतला होता. त्या विषयाचें शिक्षण डेक्कन कॉलेजमध्यें दिलें जात नव्हतें. म्हणून अनंतराव आणि त्यांचे सहाध्यायी श्री. विद्यासागर बखले हे त्यावेळीं पुण्यास पुरातत्त्वखात्याचे सुपरिंटेंडेंट म्हणून आलेले सुप्रसिद्ध पुरातत्त्वज्ञ राखालदास बॅनर्जी यांच्याकडे त्या विषयाच्या मार्गदर्शनाकरितां मधूनमधून जात असत. बॅनर्जींच्या संशोधननैपुण्याचा दोघांवरहि चिरस्थायी परिणाम झाला. श्री. बखले पुढें वकिलीच्या धंद्यांत पडून न्यायखात्यांत गेले. त्यामुळें त्यांना या विषयांत फारसें कार्य करतां आलें नाहीं. तथापि त्यांचा सातवाहन राजवंशाच्या इतिहासावरील प्रबंध त्यांच्या तत्कालीन व्यासंगाची साक्ष देतो. अळतेकरांनी मात्र आपलें सर्व आयुष्य संशोधनास वाहिलें आणि त्या क्षेत्रांत आन्तरराष्ट्रीय कीर्ति मिळविली.

## आरंभींचे संशोधनपर प्रबन्ध

अनंतराव एम्. ए. परीक्षेंतहि पहिल्या वर्गांत उत्तीर्ण होऊन त्यांस संस्कृतच्या सर्व छात्रवृत्त्या व पारितोषिकें मिळालीं. त्यापैकी एका छात्रवृत्तीकरितां एल् एल्. बी. च्या टर्म भरणें आवश्यक असल्यानें त्यांनी ती परीक्षाहि दिली. पण त्यांचा ओढा वकीलीकडे नव्हता. म्हणून त्यांनी प्राचीन भारतीय इतिहासाचा व्यासंग चालू ठेवला. मधून मधून ते मुंबई विश्वविद्यालयाच्या पारितोषिकाकरितां निबंध पाठवीत असत. त्यामध्यें त्यांच्या गाढ व्यासंगाचा व सूक्ष्म संशोधनाचा परिपाक दृष्टीस पडत असे. भगवानलाल इंद्रजी सुवर्णपदकाकरितां लिहिलेला 'गुजराथ आणि काठेवाड मधील मुख्य नगरांचा इतिहास' या विषयावरचा त्यांचा निबंध पुढें 'इंडियन अँटिक्वरी' या सुप्रसिद्ध संशोधन मासिकांत प्रसिद्ध झाला. त्यांत त्यांच्या प्राचीन कोरीव लेखांच्या व्यासंगाची प्रतीति येते. असाच दुसऱ्या एका पारितोषिकाकरितां लिहिलेला 'पश्चिम भारतांतील ग्रामस्थांचा इतिहास' या विषयावरचा दुसरा निबंध परीक्षकांच्या शिफारशीस अनुसरून मुंबई विश्वविद्यालयाने स्वतः प्रसिद्ध केला. या ग्रंथांत त्यांनीं केवळ प्राचीन वाङ्मय व कोरीव लेख यांचाच नव्हे तर राजवाडे, खरे, पारसनीस इत्यादिकांनीं प्रकाशित केलेल्या कागदपत्रांचा तसेंच सरकारी अहवालांचा पूर्ण अभ्यास करून ग्रामाधिकारी, ग्रामीण जीवन –शिक्षण, आरोग्यव्यवस्था, धंदे, मनोरंजनाचीं साधनें, धार्मिक उत्सव –वगैरेविषयीं मोठ्या परिश्रमानें साधार माहिती दिली आहे. शेवटीं प्राचीन ग्रामसंस्थांचें पुनरुज्जीवन करणें कितपत शक्य आहे व त्याकरितां कोणते उपाय योजणें आवश्यक आहे याची चर्चा केली आहे. हें पुस्तक बत्तीस वर्षांपूर्वी प्रसिद्ध झालें असलें तरी त्यांतील सूचना जनपदसंस्थांच्या आजच्या पुनरुज्जीवनप्रसंगींहि अत्यंत उपयुक्त वाटतील अशा आहेत. दुर्दैवाची गोष्ट ही कीं या पुस्तकाकडे आमच्या राज्यकर्त्यांचें व समाजसुधारकांचें लक्ष गेलें नाहीं. अनंतराव एकदा सांगत होते कीं त्या पुस्तकाचा प्रसार न झाल्यामुळें प्रकाशक त्याच्या प्रती रद्दीच्या भावानें विकण्याच्या विचारांत होते. काय ही आमची ज्ञानलालसा!









अनुक्रमणिका

## बनारस विद्यापीठांत नियुक्ति

वरील दोन्ही निबंधांत अनंतरावांची बुद्धिमत्ता, चौफेर व्यासंग, आणि चिकित्सक वृत्ति यांचा मनोज्ञ संयोग दृष्टीस पडतो. अशा तऱ्हेच्या निबंधांनी व लेखांनी त्यांचें नांव विद्वानांस परिचित झालें. या सुमारास पंडित मदन मोहन मालवीय बनारस विश्वविद्यालयाकरितां प्राचीन भारतीय इतिहास व संस्कृति या विषयाच्या प्राध्यापकाच्या शोधांत होते. त्यावेळीं अनंतराव अगदीं तरुण होते तरी त्यांची निवड करून मालवीयांनी त्यांस त्या विषयाकरितां नियुक्त केलें आणि एक दोन वर्षें त्यांस विशेष काम न देतां त्या विषयाचा जास्त व्यासंग करण्यास सांगितलें. या अवधींत अनंतरावांनीं 'राष्ट्रकूट नृपति आणि त्यांचा काळ' हा ग्रंथ बनारस विश्वविद्यालयाच्या डी. लिट्. पदवीकरितां लिहिला. त्याच्या परीक्षकांत डॉ. थॉमस, डॉ. देवदत्तपंत भांडारकर आणि डॉ. सुखटणकर यांसारखे पहिल्या प्रतीचे संशोधक होते. त्यांनी त्याची मुक्तकंठानें स्तुति केली. हा ग्रंथ पुढें पुण्याच्या ओरिएंटल बुक एजन्सीनें प्रसिद्ध केला. यापूर्वीं डॉ. फ्लीट व डॉ. रामकृष्णपंत भांडारकर यांनीं राष्ट्रकूटांच्या राजकीय इतिहासाविषयीं लिहिलें होतें पण तत्कालीन राज्यशासन, धार्मिक, सामाजिक व आर्थिक परिस्थिति, शिक्षण, वाङ्मय वगैरे विषयांची चर्चा केली नव्हती. अनंतरावांच्या या ग्रंथांत या सर्व विषयांची साधार व विस्तृत चर्चा आली आहे. या ग्रंथानें प्राचीन भारतीय राजवंशांचा सर्वांगीण इतिहास कसा लिहावा याचा आदर्श घालून दिला असें म्हणण्यास हरकत नाहीं. यानंतर पाल, चंदेल्ल, प्रतीहार, परमार वगैरे प्राचीन राजवंशांचे इतिहास याच पद्धतीचे प्रसिद्ध झाले आहेत.

राष्ट्रकूटांच्या इतिहासग्रंथानें डॉ. अळतेकरांचें नांव सर्वांमुखीं झालें आणि त्यांची त्या विषयाच्या प्रमुख प्राध्यापकामध्यें गणना होऊं लागली. त्यानंतर त्यांची बनारस विश्वविद्यालयांत प्राचीन भारतीय इतिहास व संस्कृति या विषयाचे मणींद्रचंद्र नन्दी प्रोफेसर म्हणून १९३० साली नेमणूक करण्यांत आली. या जागीं त्यांनी एकोणीस वर्षें (१९३०–१९४९) काम करून अनेक विद्यार्थी तयार केले. त्यांपैकी आतां कित्येक पुरातत्त्व खात्यामध्ये उच्चपदांवर असून उत्कृष्ट कार्य करीत आहेत.

## विविध ग्रंथसंपत्ति

बनारस विश्वविद्यालयांत असतांना डॉ. अळतेकरांनी विविध विषयांवर ग्रंथरचना केली. त्यांचा प्राचीन भारतीय शिक्षणपद्धति हा ग्रंथ त्या विषयावरील अत्यंत प्रमाणभूत मानला जातो. हा मूळ इंग्रजींत लिहिला असून नंतर त्याचें मराठी रूपांतर प्रा. बनहट्टीच्या नवभारतग्रंथमालेंत १९३५ सालीं प्रसिद्ध झालें. यामध्यें वैदिक कालापासून सन १२०० पर्यंतच्या भारतीय शिक्षणपद्धतीच्या स्वरूपाचें विवेचन आलें आहे. यामध्यें गुरुशिष्यसंबंध, शिक्षणक्रम, शिक्षणपद्धति, परीक्षा, धंदेशिक्षण, स्त्रीशिक्षण, शिक्षणाचें ध्येय इत्यादि शिक्षणविषयक विविध बाबींबद्दल माहिती हिंदु, बौद्ध व जैन वाङ्मय, कोरीव लेख वगैरेंच्या आधारें दिली आहे आणि भारतीय शिक्षणपद्धतीच्या गुणदोषांची चर्चा केली आहे. अनेक भारतीय विद्यापीठाच्या अभ्यासक्रमांत या ग्रंथाला मानाचें स्थान मिळालें आहे.

यानंतर १९३८ सालीं त्यांचा 'प्राचीन भारतांतील स्त्रियांची परिस्थिति' हा ग्रंथ इंग्रजींत प्रसिद्ध झाला. इतर ग्रंथांप्रमाणें याहि ग्रंथांत त्यांनी वाङ्मय, कोरीव लेख, प्राचीन शिल्पें, चित्रें, नाणीं, प्रवासवृत्तें वगैरे विविध साधनांचा उपयोग करून त्यांतील विषयाचें सर्वांगीण स्वरूप विशद केलें आहे. तसेंच आधुनिक काळांत उत्पन्न झालेले स्त्रियांचे प्रश्न कसे सोडवितां येतील यासंबंधीं आपले मौलिक विचार मांडले आहेत. स्त्रियांचें शिक्षण, त्यांचा विवाह व घटस्फोट, सतीची चाल, नियोग, स्त्रियांचे संस्कार, स्त्रीधन, त्यांची वेषभूषा वगैरेविषयी अत्यंत महत्त्वाची व मनोरंजक माहिती यांत ग्रथित केलेली असल्यामुळें हा ग्रंथ लौकरच लोकप्रिय झाला आणि त्याच्या दुसऱ्या आवृत्तीचा योग १९५६ सालीं आला.

सन १९३८ सालीं काशींतील श्रीविश्वनाथ मंदिराच्या परिसरासंबंधीं झगडा उत्पन्न होऊन तें प्रकरण कोर्टांत गेलें. त्यावेळीं डॉ. अळतेकरांना साक्ष द्यावी लागली होती. त्यानिमित्तानें त्यांनी काशीच्या प्राचीन इतिहासाचा साकल्यानें अभ्यास करून त्यावर पुस्तक लिहिलें तें आता दुर्मिळ झालें आहे.



अनुक्रमणिका

यानंतर १९४६ सालीं त्यांनी व डॉ. उमेशचंद्र मुजुमदार यांनी भारतीय इतिहास परिषदेच्या भारतीय इतिहास योजनेंतील सहावा 'वाकाटक–गुप्त–युग' नामक भाग प्रसिद्ध केला. त्यांतील वाकाटक व तत्पूर्वकालीन राजवंश यांचा इतिहास तसेंच तत्कालीन राज्यशासन, धार्मिक परिस्थिति, वाङ्मय, तत्त्वज्ञान वगैरे-विषयींचीं प्रकरणें डॉ. अळतेकरांच्या हातचीं आहेत.

याशिवाय शिलाहारांचा इतिहास, प्राचीन भारतांतील शासनसंस्था इत्यादि त्यांचे ग्रंथ सुप्रसिद्ध आहेत. शासनसंस्थाविषयक ग्रंथाचें हिंदी रूपांतर प्रसिद्ध झालें असून त्याच्या आतांपर्यंत तीन आवृत्त्या निघाल्या आहेत. या ग्रंथांत शासनसंस्थेचा उद्गम व विकास, गणराज्यें, राजसत्ता, मन्त्री, कर, आय व व्यय, आन्तरराष्ट्रीय संबंध वगैरे विविध विषयांचें विवेचन आलें असून प्राचीन काळचें शासन संस्थेचें ध्येय विशद केलें आहे.

## कोरीव लेखांचें संपादन

डॉ. अळतेकर उत्कृष्ट संस्कृतज्ञ असल्यानें त्यांचें सर्व विवेचन यथातथ्य व सप्रमाण होत असे. प्राचीन कोरीव लेख व नाणीं यांचें वाचन व संपादन करण्यांत त्यांचा हातखंडा होता. त्यांचा या विषयांतील अधिकार लक्षांत घेऊन अत्यंत महत्त्वाचे असे कोरीव लेख त्यांच्याकडे संपादनाकरितां पाठविले जात आणि तेहि त्यांच्या संपादनांत पराकाष्ठेचे प्रयत्न करीत. त्यांनी अशा रीतीनें संपादिलेल्या लेखांत बडवा व बर्नाला येथील यूपांवरचे कोरीव लेख, धुम्ली (काठेवाड) येथील सैंधव राजांचे सहा ताम्रपट इत्यादिकांचा निर्देश केला पाहिजे. या सर्व लेखांत त्यांची कांटेकोर संशोधनपद्धति, अचूक वाचन आणि प्रतिपादनांतील संयम हीं दृष्टीस पडतात.

## भारतीय नाणक परिषदेंतील कार्य

त्यांचें प्राचीन नाण्यांच्या संपादनाचें कार्यहि असेंच महत्त्वाचें आहे. सुमारें पन्नास वर्षांपूर्वी (सन १९१० मध्यें) पांच युरोपीय व एक हिंदी अशा सहा गृहस्थांनी भारतीय नाणक परिषदेची स्थापना केली व भारतीय प्राचीन नाण्यांच्या अभ्यासाला चालना दिली. त्यानंतर १९३९ सालापर्यंत त्या परिषदेचें स्वतःचें नियतकालिक नव्हतें. या काळांत भारतीय नाण्यांवरचे संशोधकांचे लेख बंगाल एशियाटिक सोसायटीच्या जर्नलमध्यें परिशिष्टरूपानें छापले जात. ही परिस्थिति समाधानकारक नव्हती म्हणून १९३९ सालीं परिषदेचें स्वतःचें जर्नल काढण्यांत आलें. त्याच्या पहिल्या वर्षाच्या संपादकांनी एक वर्षांतच तें काम सोडलें. आणि सन १९४० मध्यें डॉ. अळतेकरांची मुख्य संपादक म्हणून निवड झाली. हें अत्यंत जोखमीचें काम त्यांनी सतत चौदा वर्षें संभाळलें. या काळांत त्यांनी स्वतः अनेक नाणीं प्रकाशित केलीं इतकेंच नाही तर अनेक होतकरू अभ्यासकांना उत्तेजन देऊन त्यांच्याकडून संशोधनपर लेख लिहविले. पूर्वी क्वचितच कोणी नाण्यांचा अभ्यास करीत असत. तें काम नाणावलेल्या तज्ज्ञांचें आहे असा समज प्रचलीत झाला होता. पण डॉ. अळतेकरांच्या प्रोत्साहनानें अनेक तरुण अभ्यासकांना स्फूर्ति मिळून नाणकविषयक लेखांच्या संख्येंत पुष्कळच वाढ झाली. त्यानंतर मध्यंतरी चार वर्षें या जर्नलचें काम दुसऱ्या विद्वानाकडे दिलें गेलें होतें. पण त्यानें तें कंटाळून सोडल्यावर डॉ. अळतेकरांना पुनः तें गतवर्षी हातीं घ्यावें लागलें.

डॉ. अळतेकर कांहीं वर्षे भारतीय नाणक-परिषदेचे अध्यक्ष होते. त्या काळांत त्यांनी 'भारतीय नाणक संग्रह' नामक ग्रंथांची योजना आंखून त्यांतील गुप्तांच्या नाण्यांविषयींचा ग्रंथ तयार करण्याचें काम स्वतः हातीं घेतलें. मध्यंतरी १९४६ सालीं भरतपुरसंस्थानांतील बयाना गांवीं गुप्त सम्राटांच्या जवळ जवळ दोन हजार नाण्यांचा फार मोठा संचय यदृच्छेनें सांपडला. त्यांचा अभ्यास करून सविस्तर वर्णन करणें आणि त्यांमुळें उत्पन्न झालेल्या विविध प्रश्नांचा उलगडा करणें हें अत्यंत महत्त्वाचें, परिश्रमाचें व जोखमीचें काम हातीं घेऊन डॉ. अळतेकरांनीं तें सतत आठ वर्षें परिश्रम करून सन १९५४ मध्ये पुरें केलें. पुढें सर्व गुप्त नाण्यांचा पूर्वोक्त कॅटलॉगहि त्यांनी प्रसिद्ध केला. हे दोन्ही ग्रंथ प्रमाणभूत मानले जातात. या योगें त्यांची कीर्ति चिरकाल टिकेल.

## पाटणा येथील संशोधनकार्य

डॉ. अळतेकर प्राचीन भारतीय इतिहासाचे अग्रगण्य प्राध्यापक गणले गेल्यामुळें सन १९४९ मध्ये पाटणा विश्वविद्यालयांत प्राचीन भारतीय इतिहास व संस्कृति










यांचा विभाग सुरू करण्याचें ठरलें तेव्हां त्या विश्व-विद्यालयाच्या अधिकारी वर्गाने डॉ. अळतेकरांस मोठ्या सन्मानानें बोलावून तो विभाग त्यांच्यावर सोंपविला. त्यामुळें त्यांच्या आयुष्यांतील शेवटचीं दहा वर्षें पाटणा शहरांत गेलीं. या अवधींत त्यांनी त्या विभागाला व्यवस्थित रूप दिलें इतकेंच नाही तर पाटणा शहरीं स्थापलेल्या काशीप्रसाद जयस्वाल संशोधन संस्थेचें संचालकपदहि संभाळलें. या अवधींत त्यांनी तिबेटी संस्कृत ग्रंथमाला सुरू केली. या मालेंत त्रिपिटका-चार्य राहुल सांकृत्यायन यांनी मोठ्या परिश्रमाने तिबेटांतून आणलेल्या ताडपत्री पोथ्यांवरून पुरातन संस्कृत ग्रंथ प्रसिद्ध केले जातात. डॉ. अळतेकर यांच्या मार्गदर्शकत्वाखालीं या मालेंत प्रज्ञाकर गुप्ताचें प्रमाण-वार्त्तिक भाष्य, दुर्वेक मिश्राचा धर्मोत्तरप्रदीप यासारखे कांहीं ग्रंथ विद्वानांनी संपादिले आहेत. याशिवाय जय-स्वालसंस्थेतर्फे पाटणा व वैशाली येथें उत्खननाचें कार्यहि करण्यांत आलें. पाटणा येथें अशोकाच्या आणखी एका स्तंभाचे अवशेष सापडले तर वैशाली येथे लिच्छवि गणाने भगवान् बुद्धाच्या अस्थींवर बांधलेल्या स्तूपाचा शोध लागला. उत्खननाचें काम अत्यंत कष्टाचें व जिकी-रीचें. पण साठी उलटलेल्या डॉ. अळतेकरांनी तें मोठ्या उत्साहानें तडीस नेलें. वैशाली येथील स्तूपाच्या संशोधनाने त्यांना जागतिक कीर्ति मिळेल यांत संशय नाहीं.

## अमेरिकन व युरोपीय विद्यापीठांस भेट

डॉ. अळतेकरांच्या संशोधनाने त्यांची कीर्ति दिगंतीं पसरल्यामुळें अमेरिकेंतील येल विश्वविद्यालयाने त्यांना व्हिजिटिंग प्रोफेसर ( आमंत्रित प्राध्यापक ) म्हणून व्याख्यानाकरितां १९५४ सालीं निमंत्रण दिलें. त्यांनी तें स्वीकारून सुमारें सहा महिने पर्यंत अमेरिकेंत व्याख्यानें दिलीं. परत येतांना भारत सरकारच्या आदेशावरून ब्रिटिश वेस्ट इंडीज देशांत त्यांनी भारतीय संस्कृतीवर व्याख्यानें दिलीं. १९५७ मध्यें पश्चिम जर्मनीच्या कांहीं विद्यापीठांत प्राचीन भारतीय इतिहासाचा विभाग काढण्याचें ठरलें तेव्हां त्यासंबंधी सूचना देण्याकरितां त्या जर्मन सरकारने डॉ. अळते-करांना बोलाविलें होतें. तेंहि काम करून त्यांनी पाश्चात्य विद्यापीठांचे धन्यवाद मिळविले.

## विद्याक्षेत्रांतील मानसन्मान

डॉ. अळतेकर हे प्राचीन भारतीय इतिहास व संस्कृति या विषयांचे सर्वोच्च तज्ज्ञ असल्यामुळें त्यांची अनेक मंडळांवर नेमणूक होत असे. स्वतः त्यांची वृत्ति प्रसिद्धिपराङ्मुख असल्यामुळें आणि राज-कारणांतल्याप्रमाणें विद्येच्या क्षेत्रांतहि दलबंदी होत असल्यामुळें कांहीं मान त्यांना योग्य वेळीं मिळाले नाहींत. ते कित्येक वर्षें अखिल भारतीय प्राच्यविद्या परिषदेचे कार्यवाह होते. पुढें त्यांना त्या परिषदेचे उपाध्यक्षहि निवडण्यांत आलें. पण अध्यक्षपदीं मात्र त्यांची निवड झाली नव्हती. शेवटीं दोन वर्षांपूर्वीं दिल्ली येथील अधिवेशनांत त्यांना तो मान देण्यांत आला. इतिहास क्षेत्रांतील त्यांची सर्वोच्च कामगिरी लक्षांत घेतां भारतीय इतिहास परिषदेचें अध्यक्षपद त्यांना कित्येक वर्षांपूर्वीं मिळावयास पाहिजे होतें. पण त्या परिषदेच्या कांहीं प्रमुख मत्सरी कार्यकर्त्यांच्या हट-वादीपणामुळें तें त्यांस न मिळतां ज्यांनी इतिहासाच्या क्षेत्रांत फारच थोडें काम केलें आहे अशा गृहस्थांस गेलीं पांच सहा वर्षें तें देण्यांत आलें. शेवटीं अनेक सभासदांस याची शरम वाटून त्रिवेंद्रम येथील गेल्या अधिवेशनांत त्यांची अध्यक्षपदीं निवड झाली. डिसेंबर महिन्याच्या शेवटीं आसा-मांत गोहत्ती येथे त्यांच्या अध्यक्षतेखालीं होणाऱ्या अधिवेशनाची आम्ही आतुरतेने वाट पाहत होतों. तेंहि आपल्या अध्यक्षीय भाषणांत हडप्पा संस्कृति आणि आर्य संस्कृति यांच्या परस्पर संबंधाविषयीं आपले मौलिक विचार मांडणार होते. पण अगदीं ऐनवेळीं निर्घृण काळाने त्यांना ओढून नेऊन सर्वांची निराशा केली आहे.

## साधी राहणी आणि उच्च विचारसरणी

डॉ. अळतेकर हे खरे सज्जन होते. ते स्वभावानें प्रेमळ आणि वृत्तीने सात्त्विक होते. साधी राहणी आणि उच्च विचारसरणी यांचें ते मूर्तिमन्त प्रतीक होते. त्यांचा पोषाख साधा व खादीचा असे. अमेरिकेला गेल्यावरच त्यांनी पाटलोण वापरली असावी. वडि-लांच्या सच्छील व धार्मिक वृत्तीचा त्यांच्यावर लहान-पणीं जो परिणाम झाला होता तो चिरकाल टिकला. त्यांनी कधीहि कोणास एका शब्दानेहि दुखविलें नाही.

कै. डॉ. अनंत सदाशिव अळतेकर

आपल्या प्रतिस्पर्ध्याच्याहि गुणांची ते मनमोकळेपणाने प्रशंसा करीत. ते आपल्या मताचा सप्रमाण व जोरदार रीतीने पुरस्कार करीत पण आपल्या मताविरुद्ध सबळ पुरावा आहे असें आढळून येतांच आपली चूक कबूल करीत. असे अनेक प्रसंग माझ्या आठवणींत आहेत. त्यांच्या मित्रत्वाने कोणालाहि धन्यता वाटावी असे ते गृहस्थ होते. मला स्वतःला त्यांच्या मैत्रीचा लाभ मी प्राचीन भारतीय इतिहासांत काम करूं लागल्यापासून गेल्या तीस वर्षांत झाला होता. या काळांत त्यांच्याशी अनेकदां विवाद्य प्रश्नांची चर्चा करण्याचा योग आला. ते भारतीय नाणक परिषदेच्या जर्नलचे संपादक होते आणि मी त्या जर्नलमध्यें अनेकदा लिहीत असे. या निमित्ताने माझा व त्यांचा घनिष्ठ संबंध आला होता. अनेक विषयांवर त्यांचा व माझा मतभेद होत असे पण त्यामुळें आमच्या मत्रींत कधीहि वितुष्ट आलें नाही. या परिचयाच्या रूपाने मी त्यांस आपली श्रद्धांजलि जड अंतःकरणाने अर्पण करीत आहे.

— वा. वि. मिराशी

---









डॉ. व. दि. राव

# रियासतकार सरदेसाई

रियासतकार सरदेसाई गेल्या महिन्याच्या नोव्हेंबर २९ तारखेस निधन पावले. त्यांच्या निधनाची बातमी ऐकून साऱ्या महाराष्ट्रास धक्का बसला. भारतांतील इतिहास भक्ताची फार मोठी हानी झाली. त्यातल्या त्यांत मराठ्यांच्या इतिहासाचें झालेलें नुकसान भरून येण्यास फार मोठा अवधि लागेल.

रियासतकारांचा जन्म १७ मे १८६५ साली कोकणांतील 'गोविल' नांवाच्या एका खेड्यांत झाला. आपल्या लहानपणीं ते गुरें राखण्याचें काम करीत असत. शाळेंत जाण्याचें वय झाल्यावर आपल्या खेड्यापासून सहा मैल लांब असलेल्या गांवीं रोज पायी जात व येत. कदाचित् यामुळेंच त्यांची प्रकृति उतारवयापर्यंत बरीच निकोप राहिली. शालेय शिक्षण संपून त्यांनी फर्ग्युसन कॉलेजमध्यें प्रवेश केला. फर्ग्युसनचे ते पहिले विद्यार्थी. त्यांच्या सहाध्यायामध्यें म. म. दत्तोपंत पोतदारांचे वडील होते. फर्ग्युसनमधून ते मुंबईस एलफिन्स्टन कॉलेजांत आले व तेथूनच ते बी. ए. झाले. याच सुमारास एका अकल्पित योगायोगानें त्यांच्या जीवनास निराळें वळण लागलें व तें त्यांना मोठें फायदेशीर झालें.

बडोद्याचे महाराज कै. सयाजीराव गायकवाड ह्यांस पुस्तकें, मासिकें वगैरे वाचून दाखविण्यास एक रीडर हवा होता. महाराजांनी ती गोष्ट आपल्या विश्वासांतील कै. बापूसाहेब आठले यांना सांगितली. बापूसाहेब यांचा व सरदेसायांचा घरोबा होता. त्यांनी सरदेसायांस बडोद्यास बोलाविलें. सयाजीरावांना निद्रानाशाचा विकार होता. त्यामुळें झोप येईपर्यंत ते निरनिराळ्या प्रकारच्या पुस्तकांचें वाचन सरदेसायांच्या कडून करून घेत. अशा रीतीनें नोकरीच्या निमित्तानें कां होईना पण सरदेसायांचें फार मोठें वाचन झालें. कांहीं काळांनीं सरदेसायांचा व्यासंग पाहून महाराजांनी त्यांच्याकडे राजकुमारांना शिकविण्याचें काम सोपविलें. कोणतेंहि कार्य हातांत घेतलें कीं तें मन लावून करावयाचें; त्यासाठीं कितीहि श्रम झाले तरी पर्वा करावयाची नाही असा त्यांचा स्वभाव होता. त्यामुळें आपल्या विद्यार्थ्यांना शिकविण्यासाठीं त्यांनीं निरनिराळ्या विषयांचीं टांचणें तयार केलीं. त्यापैकीं इतिहासाची त्यांना जास्तच आवड असल्यामुळें इतिहासाचीं टांचणें त्यांनी विस्तृत प्रमाणांत तयार केलीं. हीं त्यांचीं टांचणें 'वांईकर भटजी' या सुप्रसिद्ध कादंबरीचे लेखक कै. रामचंद्रपंत टिकेकर यांच्या नजरेस पडलीं; व त्यांनी तीं 'सयाजी विजय' च्या संपादकाकडे नेऊन दिलीं. या घडामोडींतून सुप्रसिद्ध रियासतींचा जन्म झाला.

मुसलमानी रियासत, मराठी रियासत आणि ब्रिटिश रियासत या नांवानें त्यांनी अकराव्या शतकांपासून ते विसाव्या शतकापर्यंत भारताचा सुसंबद्ध इतिहास नऊ खंडांत मराठी वाचकांच्या हातीं दिला. भारताचा इतिहास एके ठिकाणी, संगतवार आणि माहितीपूर्ण असा रियासतींत आल्यामुळें त्यांच्या रियासतींना फार मोठी प्रसिद्धी मिळाली. यामुळें नंतर जरी त्यांना रावसाहेब, रावबहादूर, डॉक्टर, पद्मविभूषण वगैरे पदव्या मिळाल्या तरी महाराष्ट्र त्यांना रियासतकार याच नांवानें ओळखतो.

इतिहासाच्या अभ्यासाच्या निमित्तानें त्यांची सुप्रसिद्ध वंगीय इतिहासकार सर जदुनाथ सरकार यांची ओळख झाली. या ओळखीचें रूपांतर पुढें

गाढ स्नेहांत झालें. जवळ जवळ पन्नास वर्षे ह्या दोघांचा इतिहासविषयक पत्रव्यवहार चालू होता. यापैकीं निवडक पत्रव्यवहार पंजाबचे डॉ. हरीराम गुप्ता यांनी 'सर जदुनाथ सरकार स्मारक' ग्रंथांत प्रसिद्ध केला आहे. त्यावर जरी ओझरती नजर टाकली तरी इतिहासांतील विवाद्य स्थळें स्पष्ट करण्यासाठीं तसेंच तारखा ठरविण्यासाठीं ह्या दोन इतिहास महर्षिंनी किती श्रम केले. याची कल्पना करतां येईल.

बडोद्याच्या नोकरींत असतांना कांहीं इंग्रजी ग्रंथांचीं भाषांतरें त्यांनी प्रसिद्ध केलीं. त्याचप्रमाणें 'ब्रिज', 'व्हीस्ट' वगैरे पाश्चात्य परयांच्या खेळा-विषयींहि बडोद्याच्या क्रीडामालेंतून लहान लहान पुस्तकें प्रसिद्ध केलीं. पण पंचवीस सालीं बडोद्याची नोकरी सोडल्या नंतरच त्यांचें इतिहासविषयक खरें काम झालें. आपल्या आत्मचरित्रांत ते म्हणतात कीं, "नोकरीची परतंत्रता तोडून उर्वरित आयुष्य एखाद्या शांत ठिकाणी इतिहास लेखनांत घालवावें" असें आपल्याला वाटूं लागलें. ही त्यांची इच्छा देवदयेनें पूर्ण झाली.

लोणावळयाजवळ कामशेत येथे जमीन घेऊन तेथें त्यांनी शांतपणे आपलें लिखाण सुरूं केलें. पुढील वर्षी त्यांनी पाटणा विद्यापीठांत 'मराठ्यांच्या इतिहासाचे मुख्य प्रवाह' म्हणून इंग्रजीमध्यें व्याख्यानें दिलीं. लवकरच तीं पुस्तक रूपानेंहि प्रसिद्ध केलीं. याच्या अगोदर ऐतिहासिक पत्रव्यवहार, ऐतिहासिक पत्रबोध, मराठ्यांच्या इतिहासांतील साहित्य इत्यादि मराठ्यांच्या मूळ साधनांच संकलना-त्मक ग्रंथ त्यांनी प्रसिद्ध केले होते. सन १९२९ सालीं मुंबई सरकारने पुणें येथील पेशवेदफ्तर अभ्यासूंना खुलें करून त्यांतील निवडक कागदपत्रें छापण्याचें ठरविलें. व त्या कामावर सरदेसायांची मुख्य संपादक म्हणून नेमणूक झाली. या दफ्तरांत जवळजवळ दोन कोटी कागदपत्रें आहेत. या कागद-पत्रांतील वाचन करणें, विषयवार मांडणी करणें, तारखा ठरविणें इत्यादि काम अवाढव्य स्वरूपाचें होतें. प्रा. कृ. पां. कुलकर्णी, श्री. कृष्णाजीपंत पुरंदरे, डॉ. दिघे इत्यादि सहकारी सरदेसायांच्या बरोबर या कामासाठी राबत होते. कामशेतहून सकाळी १० वाजतां पुण्यास यावयाचें तें जवळजवळ सहा वाजेपर्यंत सारखें काम करीत रहावयाचें. अशा-तऱ्हेनें चार वर्षे काम करून सरदेसाई यांनी ४५ खंडांमध्यें पेशवे दफ्तरांतील निवडक कागदपत्र प्रसिद्ध केले. त्यानंतर लगेच सर जदुनाथ सरकारांच्या सहकार्यानें 'पूना रेसिडन्सी कॉर-स्पॉडन्स' संपादित करून प्रसिद्ध केला. लवकरच ग्वाल्हेर येथील महादजी शिंदे यांचे ऐतिहासिक कागदपत्र चाळून त्यांतील निवडक पत्रांचे खंड त्यांनी छापले. अशा तऱ्हेनें दहा बारा वर्षांत मराठ्यांच्या इतिहासविषयक अव्वल साधनांचा फार मोठा संभार इतिहासाच्या अभ्यासूंकरितां सरदेसाई यांनी मराठी भाषिकांपुढे ठेविला.

वयाचीं पाऊणशें वर्षे उलटण्याच्या सुमारास त्यांनी आणखी एक नवीन काम हातांत घेतलें. मराठ्यांचा इतिहास ग्रँड डफनें तीन भागांत प्रसिद्ध केला होता. त्यांतील कांहीं भागांवर कै. कीर्तने यांनी चांगली विचारप्रवर्तक टीका केलेली आहे. पण त्याच्या इतिहासावर नुसती टीका करण्यापेक्षां मराठ्यांचा खरा इतिहास भारतीय व परकीय लोकांपुढें ठेवावा अशी इच्छा बरीच वर्षे त्यांच्या मनांत होती. तें काम त्यांनीं आतां हातांत घेतलें व तीन खंडांमध्यें 'ए न्यू हिस्ट्री आफ् दी मराठाज्' या नांवानें मराठ्यांचा सुमारें दोनशें वर्षांचा इतिहास त्यांनी प्रसिद्ध केला. सुमारें दोन तीन वर्षां-पूर्वी कै. वि. सी. चितळे यांच्या सहकार्याने मराठ्यां-च्या ऐतिहासिक घराण्यांच्या वंशावळी त्यानी तयार केल्या.








अशा रीतीने आपलें सबंध आयुष्य सरदेसाई यांनी इतिहास या एकाच विषयांस वाहून घेतलें. दुर्दैवानें खाजगी जीवनांत त्यांना फार मोठें दु:ख सहन करावें लागलें. त्यांचे दोन चिरंजीव श्रीवत्स आणि श्यामकांत हे त्यांच्या हयातीत वारले. त्यापैकीं श्यामकांत तर पी. एच्. डी. पर्यंत शिकून परदेशांत वारला. श्यामकांताच्या मृत्युनंतर कै. नरसोपंत केळकरांनी सरदेसाई यांना पाठविलेल्या सांत्वनपर पत्रांत म्हटलें होतें कीं, "इतिहास हा तुम्ही आपला पुत्र मानला आहे व तो अमर आहे." खरोखरच इतिहासाला आपला पुत्र मानल्यामुळेंच पुत्रदु:खाचें हलाहल ते पचवूं शकले. सुमारें पांच-वर्षांपूर्वी ते मला आपले अनेक फोटो दाखवित होते त्यांत श्यामकांताचे मृत्यूशय्येवरील व मृत्यूनंतरचे फोटो होते. ते दाखवतां दाखवतां त्यांच्या डोळयांत पाणी चमकूं लागलें. तसेंच १९४३ साली त्यांची पत्नी निधन पावल्यावर आपलाहि अंतकाल जवळ आला आहे असें त्यांना वाटूं लागलें. त्या सुमारास मला लिहिलेल्या एका पत्रांत ते म्हणतात, "माई गेल्या, माझे सुद्धां जाण्याचे दिवस आले त्यापूर्वी एकदां भेटून जा." सुदैवाने त्यानंतर त्यांना पंधरा वर्षांचें आयुष्य मिळालें व त्याचा त्यांनी फार चांगला उपयोग केला.

इंग्रज सरकार, भारतीय सरकार, विद्यापीठें या सर्वांकडून त्यांच्या विद्याव्यासंगाचें कौतुक झालें. इंग्रज सरकारनें त्यांना रावसाहेब, रावबहादूर या पदव्या दिल्या तर आपल्या सरकारनें त्यांना पद्मविभूषण केलें. सातार्‍याचे छत्रपति व बडोद्याची जनता यांनी त्यांना मानपत्र दिलें. पुणे विद्यापीठानें त्यांना डॉक्टरेट देऊन त्यांचा व आपला गौरव केला.

१९३८ सालीं कामशेत येथें आक्टोबरच्या एक तारखेपासून सात तारखेपर्यंत एक इतिहास सप्ताह साजरा करण्यांत आला. त्यावेळीं भारताच्या सर्व भागांतून इतिहासतज्ञ कामशेत येथें जमले होते. सुदैवानें मलाहि त्यावेळीं तेथें राहण्याची संधि मिळाली. त्यामुळें भारतीय इतिहासतज्ञांना रियासत-कारांविषयी किती आपुलकी वाटत होती व त्यांच्या व्यासंगाविषयीं किती आदर वाटत होता तें प्रत्यक्ष पहाण्याची मला संधि मिळाली.

आमच्या पिढीला सुमारें पंचविस वर्षे काम पुरेल इतका साधन संभार त्यानी मराठी इतिहासाच्या अभ्यासुंपुढे ठेविला आहे. त्याचा योग्य उपयोग करणें हेंच त्यांचें खरें स्मारक होईल.

---












प्रा. गं. ब. ग्रामोपाध्ये

# आधुनिक आर्यभारतीय भाषा -- आणि 'अंतर्-बहिर्-वर्तुळ' सिद्धांत.

आज हिंदुस्थानांत ज्या आर्यभारतीय भाषा आहेत त्यांचा तौलनिक आणि ऐतिहासिक अभ्यास केला असतां, पश्चिम हिंदी ही भाषा इतर आर्यभारतीय भाषांहून अनेक बाबतींत निराळी आहे, असें दिसतें. आणि विशेष म्हणजे ज्या बाबतींत ती इतर आर्य-भारतीय भाषांहून निराळी आहे, त्याच बाबतींत त्या इतर भाषा– त्या आपापल्यापरी स्वतःचा निराळेपणा राखून असल्या तरी – एकमेकींशीं साम्य दाखवितात. प्रादेशिक दृष्ट्या पाहिलें तर पश्चिम हिंदी गंगेच्या पश्चिम दुआबांतली, म्हणजे त्या काळच्या मध्य देशांतली, तर इतर भाषा तिच्या आवर्तीभोंवर्तीच्या प्रदेशांतल्या, जणू तिच्या भोंवती एक कडें करून असलेल्या. आर्य-भारतीय भाषांच्या या प्रादेशिक स्थानावरून भाषा-शास्त्रज्ञांनी त्यांना पश्चिम हिंदीच्या भोवतीं वर्तुळ करणाऱ्या भाषा असें म्हटलें आणि भाषाविषयक 'अंतर्वर्तुळ-बहिर्वर्तुळ' सिद्धांत मांडला आहे. या सिद्धांताप्रमाणें पश्चिम हिंदी ही अंतर्वर्तुळांतली भाषा; व लांठी, सिंधी, गुजराथी, मराठी, ओरिया, बिहारी, बंगाली व आसामी या बहिर्वर्तुळांतील भाषा

आधुनिक आर्यभारतीय भाषा ह्या मूळ आर्यभारतीय भाषेच्या निरनिराळ्या अवस्थातरांतून उत्क्रांत होत गेलेल्या शाखोपशाखा आहेत. या शाखोपशाखांत मूळ स्कंध भाषेचा गुणधर्म उतरलेला असला व त्यामुळें आर्य-भारतीय हें त्यांचें विशेषणहि सार्थ झालेलें असलें, तरी देशकालपरिस्थितीप्रमाणें त्यांच्यांत इतरहि कांहीं गुण उतरले आहेत. या गुणांचें प्रमाण आणि प्रकार हीं अर्थात्, सारखीं नाहींत. कोणत्याहि भाषेचा विकास नियमितपणें आणि गणितीपद्धतीनें होत नसतो, हें ग्रिअर्सनेंच विधान येथें सार्थ ठरतें. आजच्या सर्वच आर्यभारतीय भाषांच्या अवस्थांतरांचा काल आणि त्यांचीं कारणें यांत सारखेपणा जरी असला तरी त्यांचे झालेले विकास आणि त्यांना आलेलें रूप यांच्यांत फरकहि खूपच आहे. आणि म्हणून तर त्या आज निरनिराळ्या भाषा म्हणून आपापल्या घरीं नांदत आहेत. परंतु या निराळेपणांतहि कांहीं भाषा परस्परांना जवळच्या आहेत, तर कांहीं भाषा त्यांच्यापासून दूर आहेत. या जवळ-दूरपणावरूनच या भाषांची अंतर्-बहिर्-वर्तुळांत विभागणी केली गेली आहे.

## होर्न्ले यांचा सिद्धान्त व – अन्य संशोधकांचीं मतें

'अंतर्-बहिर्-वर्तुळ' सिद्धांताचा जनक होर्न्ले हे आहेत. यांनीं आपल्या "Comparative Grammar of the Gondian Language (1880)" या ग्रंथांत प्रथम तो मांडला. या सिद्धांताप्रमाणें आर्य लोक हिंदुस्थानांत दोन टोळ्यांनीं आले. प्रथम आलेले आर्य गंगेच्या पश्चिम दुआबांत वसाहत करून होते. परंतु त्यांच्यानंतर आलेल्या आर्यांनीं प्रथम आलेल्या आर्यांना शत्रुत्वबुद्धीनें हुसकावून सभोवार पांगविलें व ते स्वतः त्यांच्या जागीं म्हणजे गंगेच्या दुआबांत, स्थिर झाले. साहजिकच आधीं आलेल्या पण नंतर गंगेच्या दुआबांतून पूर्व, पश्चिम, दक्षिण, उत्तर या दिशांना पांगलेल्या आर्यांच्या नंतर येऊन गंगेच्या दुआबांत स्थिर झालेल्यांच्या भोंवतीं एक कडें झालें. बाहेरचें 'वर्तुळ' तें हेंच; आणि या बाह्य वर्तुळांतील आर्यांच्या बोलीपासून, म्हणजे जिला होर्न्ले पूर्वेची 'मागधी बोली' म्हणतो तिच्यापासून उत्क्रांत झालेल्या

1. Grierson : B. S. O. S. Vol. I no. 3; p. 60.

भाषा. म्हणजे आजच्या लांठी, सिंधी, मराठी, ओरिया, बिहारी, बंगाली व आसामी या नांवानें ओळखिल्या जाणाऱ्या भाषा. या बाह्य वर्तुळाच्या आंत असणारी आजची भाषा म्हणजे पश्चिम हिंदी. ही अंतर्-वर्तुळांतील आर्यांच्या भाषेपासून, म्हणजे होर्न्ले जिला पश्चिमेची 'शौरसेनी बोली' म्हणतो, तिच्यापासून उत्क्रांत झालेली भाषा. होर्न्ले यांचा 'अंतर्वर्तुळ' 'बहिर्वर्तुळ' सिद्धांत तो हा. हा मुख्यतः भाषिक विशेषावर आधारलेला आहे, हें येथें लक्षांत ठेवलें पाहिजे. होर्न्ले यांच्या मतें प्रागृइतिहासकालांत उत्तर हिंदुस्थान दोन बोल-भाषांत विभागला गेला होता. एक विभाग पश्चिमेकडील शौरसेनी बोलीचा; व दुसरा पूर्वेकडील मागधी बोलीचा. परंतु या प्रागृइतिहास-कालाच्याहि आधी मागधी बोलीनें सारें उत्तर हिंदुस्थान व्यापिलें असावें, असें त्यांचें म्हणणें. त्याविना अति पश्चिमेलाहि मागधीचे अवशेष आढळते ना. हे अव-शेष वा विशेष जसजसे पूर्वेला सरकावें, तसतसें वाढत जातात, व अखेर मागधींत एकवटतात. म्हणजे शौर-सेनीची लाट पाचरीसारखी मध्यें घुसेपर्यंत सर्व उत्तर हिंदुस्थानभर मागधी हीच बोली असली पाहिजे. परंतु शौरसनीची पाचर-लाट येतांच तिला पूर्वेला व दक्षिणेला हटावें लागलें. शौरसेनीभोंवतीं मागधीचें कडें झालें तें असें. आणि म्हणूनच शौरसेनीपासून उत्क्रांत झालेल्या पश्चिमहिंदीच्या भोंवतीं मागधीपासून उत्क्रांत झालेल्या भाषांचें वर्तुळ आढळतें.[२]

होर्न्ले यांच्याप्रमाणें रिस्ले या मानववंशशास्त्रज्ञांनीहि आर्यांचें हिंदुस्थानांत आगमन दोन भिन्न टोळ्यांनीं झालें असें प्रतिपादिलें आहे. परंतु मानववंशशास्त्रदृष्ट्या त्यांनीं त्यांत थोडी तपशीलाची भर घातली आहे.[3] रिस्ले मतें प्रथम आलेले व पश्चिम मध्य पंजाबांत वसाहत करून राहिलेले आर्य, येतांना आपल्या बरोबर आपल्या स्त्रियांनाहि घेऊन आले होते. परंतु नंतर आलेल्यांनीं, ते ज्या मार्गानें आले, तो मार्ग सोईचा नसेल म्हणून असेल कदाचित्, पण त्यांनीं आपल्या बरोबर आपल्या स्त्रिया आणल्या नव्हत्या. साहजिकच ज्या कृष्णवर्णीय द्राविडांच्या प्रदेशांत-मध्य-देशांत-ते राहिले त्या द्राविडांच्या स्त्रिया त्यांनीं पत्क-रल्या. हे नंतर आलेले आर्य मूलतः गोरे व लांब डोक्याचे होते, व ते आजच्या मध्यदेशांतील आर्य-भारतीय भाषिकांचे पूर्वज होते, हें मानववंशशास्त्राच्या पुराव्यानें स्पष्ट होतें. होर्न्ले यांच्या भाषाभ्यासावर आधारलेल्या आर्यांच्या द्विरागमन सिद्धांताला रिस्ले यांचा मानववंशशास्त्राचा हा पुरावा.

ग्रिअर्सन यांना होर्न्ले यांनीं प्रतिपादिलेली आजच्या आर्यभारतीय भाषांची 'अंतर्वर्तुळ बहिर्वर्तुळ' अशी विभागणी मान्य असली, तरी त्यासाठीं होर्न्ले यांनीं मांडलेला आर्यांचा द्विरागमनसिद्धांत मान्य नाहीं. किंबहुना हा सिद्धांत आपल्याला मान्य नसूनहि तो आपल्याला संपूर्णपणें मान्य आहे, असें जें म्हटलें जातें त्याबद्दल त्यांनीं तक्रार केली आहे. ते म्हणतात : "My name has been associated with Hoernle as a thorough supporter of his argument. While fully admitting my indebtedness to Hoernle's deductions, I have always been of the opinion that it *is not necessary* to postulate two distinct invasions.[४]" तसेंच होर्न्लेंचा पाचरसिद्धांतहि ( wedge-theory ) त्यांना मान्य नाहीं. कारण नंतर आलेल्या आर्यांना आधीं आलेल्या आर्यांच्या वसाहतीमुळें पुढें सरण्यास मोकळा मार्ग मिळाला नाहीं असें गृहीत धरलें तरी दक्षिण बाजूनें मध्यदेशियांना वळसा घालून त्यांना पलीकडे पूर्वेला जाता येणें अशक्य नव्हतें आणि तसें ते गेलेहि असावेत. परंतु ते स्वतः गेलेले असोत वा त्यांनीं आधी आलेल्यांना पुढें रेटलेलें असो, भाषिकदृष्ट्या अखेर परिणाम एकच झाला. आणि तो

---

2. B. S. O. S. Vol. I, No. 3; p. 52

3. Report of the Census of India (1901) and repeated in Imperial Gazatteer of India (1907); and quoted by Grierson in foot note on p. 52, of B. S. O. S. Vol. I, No. 3

4. Singnistic Survey of India (1927): Vol. I, Ch XI, p. 116 (Foot-note)

म्हणजे गंगेच्या दुआबांतल्या आर्य भाषिकांभोवतीं त्यांच्या भाषेहून थोडी भिन्न भाषा बोलणाऱ्यांचें कडें झालें हा. मात्र होर्न्ले यांचा पाचर-सिद्धांत मान्य केला नाहीं तर 'बाह्य' वर्तुळांतले लोक नंतर आले असें मानावें लागेल.

ग्रिअर्सन यांना होर्न्ले यांनी प्रतिपादिलेले हिंदुस्थानातील आर्य लोक व आर्य भाषा यांबाबतचे द्विरागमन सिद्धांत व पाचर-सिद्धांत हे दोन्ही मान्य नसले तरी हिंदुस्थानांतील आर्य भाषांची वर्गवारी अंत् आणि बहिर् अशा वर्तुळांत करतां येते हें मान्य आहे. इतकेंच नव्हें तर फार पूर्वी उत्तरहिंदुस्थानांत सर्वत्र पसरलेल्या मागधी प्राकृत बोलीच्या मध्यें पाचरीप्रमाणें शौरसेनीचें वास्तव्य होतें, याहि होर्न्लेंच्या मताशी ते सहमत आहेत. त्यांचेच शब्द येथें उद्धृत करणें युक्त वाटतें. ते म्हणतात: "His (Hoernle's) contention seems to me to be entirely justfied, and so far back as we can trace the linguistic history of Northern India, we find a "Māgadhi Prākrit Tongue" occupying the north–west, south, and east, with a wedge of Shauraseni in the Midland, which it embraces on three sides." एकंदरीनें ग्रिअर्सन यांनीं होर्न्ले यांच्या मताचाच पुरस्कार केलेला आहे. कारण, आर्य लोक हिंदुस्थानांत दोन निरनिराळ्या भाषिक गटानें आलेले असोत कीं हळूहळू बराच काळपर्यंत येत गेलेले असोत भाषिकदृष्टया परिणाम एकच. कारण त्यांच्या येण्याची क्रिया बराच काळपर्यंत चालू होती, असें गृहीत धरलें तरी प्रथम आलेल्यांची भाषा व शेवटीं यांत खूपच फरक पडला असला पाहिजे. आणि वेदांतील ऋचांत याचा पुरावाहि सांपडतो. उदा. सुदासानें पूर्वेकडील यमुनेच्या कांठच्या पुरूंना जिंकिल्याचें सुदास-मंत्रावरून कळतें. पुरू ही आर्यांची दुसरी टोळी होती; व तिच्यांतील लोक मृध्रवाक् म्हणजे रानटी वाणीचे होते असेंहि त्या मंत्रांत म्हटलें आहे. तसेंच ब्राह्मण वशिष्ठ व क्षत्रिय विश्वामित्र यांच्यांतील चुरशीचा जो उल्लेख आढळतो त्यांतहि पश्चिम पंजाबांतील आर्य व पूर्व पंजाबांतील आर्य यांच्यांतील संघर्ष व्यक्त होतो. मूळ भारतीय युद्ध मुख्यतः कुरु आणि पाञ्चाल यामधील होतें हें गृहीत धरलें, तर तें पश्चिमेकडचे ब्राह्मणी कुरु व पूर्वेकडील ब्राह्मणविरोधी पाञ्चाल या दोन भिन्न आर्य टोळयांतील होतें हें मान्य करावें लागतें. आणि पाञ्चाल तर कुरूंच्याहून खूपच आधीं आलेले व एतद्देशीय राहिल्यानें गोऱ्यांचे काळे झालेले असे होते, हें तर सर्वमान्य झालेलें आहे.

सारांश, प्राचीन वेदकाळापासून उत्तर हिंदुस्थान आर्यवंशाच्याच पण दोन वसाहतींत विभागलेला होता. एक पश्चिमेकडील वैदिक आर्यांची व दुसरा पूर्वेकडील अवैदिक आर्यांची. वेद संकलित-संपादित झाले ते पश्चिमेकडील आर्यांकडून; साहजिकच वेदांत आढळणारी भाषा ही मुख्यतः त्यांची व त्यांच्यांत जिला 'प्रमाण' मानली जाई ती असावी. वैदिक संस्कृतीची निर्मिति व जोपासना झाली तीहि याच आर्यांच्या वसाहतींत, म्हणजे पश्चिम पंजाबांत. उदीच्य देश तो हाच. येथेंच पाणिनीनें आपली अष्टाध्यायी लिहून वैदिक मन्त्रांना शुद्ध राखण्याचा प्रयत्न केला, आणि एकंदर उदीच्य बोल भाषेला संस्कृत बनविलें. मूळ मध्यदेशांतील, म्हणजेच होर्न्ले-ग्रिअर्सन यांच्या अंतर्वर्तुळांतील भाषेची स्थिति होती ती ही अशी. याच्या उलट पूर्वेकडील वा या अंतर्वर्तुळाच्या भोंवतालील प्रदेशांतील आर्य अवैदिक होते व त्यांची भाषा दार्दिक होती. ग्रिअर्सनच्या मतें या आर्यांची वस्ती पंजाब, सिंध, गुज० राजपुताना, मराठी प्रदेश, पूर्व हिंदीचा मुलूख, बिहार ( आणि येथूनच त्यांची भाषा बंगाल, आसाम, व ओरिसा येथें पसरली ) आणि उत्तरेला हिमालयाच्या पायथ्याचे प्रदेश येथें पसरली. उदीच्य भाषेभोंवतींचें बाह्य वर्तुळ तें हेंच. आणि या वर्तुळांतील आर्य भाषेपासून उत्क्रांत झालेल्या आजच्या भाषा म्हणजे लंठी, सिंधी, गुज० मराठी, पूर्व हिंदी बिहारी, बंगाली, आसामी, ओरिया आणि पहाडी भाषा या होत. यांचें कडें मध्यदेशांतील वैदिक आर्य भाषेपासून उत्क्रांत झालेल्या पश्चिम हिंदीच्या भोंवतीं पडलेलें आहे. ग्रिअर्सननें ही वर्तुळवार विभागणी भाषाशास्त्रदृष्टया सिद्ध करून दाखविली आहे. ( B. S. O.

5. B. S. O. S. Vol. I, no. 3; p. 54.








C. Vol. I, no. 3. p. 78-85 ). तसेंच ग्रिअर्सन यांची ही विभागणी होर्न्ले यांच्या मध्यदेशीय शौरसेनी व प्राच्य मागधी या प्राकृत भाषांच्या विभागणीशींहि बरीच मिळती जुळती आहे. बरीच म्हणण्याचें कारण असें कीं, होर्न्ले शौरसेनीबरोबर महाराष्ट्रीचाहि समावेश करतात. आणि वरवर पाहतां ती शौरसेनीला जवळचीहि वाटते. कारण संस्कृत नाटकांतून जीं पात्रें गद्यांत शौरसेनी बोलतात. तींच पात्रें पद्यांत महाराष्ट्री वापरतात. म्हणजे एकाच प्राकृताच्या त्या दोन उपशाखा झाल्या. या गोष्टीला आणखीहि थोडा पुरावा देतां येतो, नाहीं असें नाहीं. उदा० स > स; आद्य र > आद्य र; आद्य य > आद्य ज; आणि 'अ' कारान्त पु० प्र. ए. वचनाचा प्रत्यय 'ओ' याबाबतींत महाराष्ट्री व शौरसेनी यांच्यांत सारखेपणा आहे. तर याच्या उलट मागधींत स > श; आद्य र > आद्य ल; आद्य ज > आद्य य; आणि 'अ'कारान्त पु. प्र. ए. वचनाचा प्रत्यय 'ए' या गोष्टी आढळतात. महाराष्ट्री ही मागधीपेक्षां शौरसेनीला जवळची वाटते त्याचें कारण हें. परंतु ती शौरसेनीहून अनेक बाबतींत वेगळीहि आहे. इतकेंच नव्हे, तर इतर अनेक बाबतींत ती मागधीशींहि साम्य दाखविते. वस्तुतः महाराष्ट्री ही सर्वच आर्यावर्तात काव्याची भाषा म्हणून महत्त्व पावलेली व त्याप्रमाणें उपयोजिलेली भाषा होती. साहजिकच तिचा संचार इतर सर्वच प्राकृत भाषिकांत हीन असल्यामुळें तिचे गुणधर्म जसे इतर प्राकृतांनीं उचललेले असणें शक्य आहे, तसेंच इतर प्राकृतांच्या कांहीं लकबाहि तिच्यांत शिरल्या असणें सहज शक्य आहे. Sten Konow चें यासंबंधींचें मत लक्षांत घेण्यासारखें आहे. ते म्हणतात, "The language of lyrical poetry is, of course, more apt to exercise such influence than that of any other branch of literature. Every Prakrit, and especially Mahārāshtri Prākrit should, therefore, be expected to be more or less of a mixed character, and this is undeniably its case."[६] आणि म्हणूनच ग्रिअर्सननें प्राकृत भाषांची जी वर्गवारी केलेली आहे ती अधिक योग्य वाटते; अंतर्-बहिर्-वर्तुळ सिद्धांताच्या दृष्टीनेंहि ती सुसंगत दिसते. ग्रिअर्सनच्या मतें शौरसेनी ही पश्चिमेची भाषा, म्हणजे त्या वेळच्या मध्यदेशांतील भाषा, तर मागधी ही पूर्वेची म्हणजे सध्यांच्या दक्षिण बिहारमधील प्रदेशांची तेव्हांची भाषा. या दोघींच्या मध्यें, दोघींनाहि थोडा थोडा सारखेपणा दाखविणारी भाषा म्हणजे अर्धमागधी. या अर्धमागधीला अधिक जवळची, पण पूर्वेच्या मागधीकडे झुकणारी भाषा म्हणजे आजच्या विदर्भाची तेव्हांची भाषा म्हणजे महाराष्ट्री.

ग्रिअर्सननें दिलेली ही प्राकृत भाषांची विभागणी व त्यांच्या त्यांच्या अपभ्रंशापासून निर्माण झालेल्या आजच्या भाषा पाहिल्या म्हणजे आर्यभारतीय भाषांच्या 'अंतर्-बहिर्-वर्तुळ' विभागणीला पूर्वपरंपराहि असल्याचें स्पष्ट होतें. ही गोष्ट खालीलप्रमाणें मांडून दाखवितां येते :

शौरसेनी > शौर० अप० > प. हिंदी; ( व कांहीं प्रमाणांत गुज० राजस्थानी[७] )
मागधी > माग० अप० > बिहारी, बंगाली, आसामी, ओरिया.
अर्धमागधी > अर्धमाग० अप० > पूर्व हिंदी
महाराष्ट्री > महा० अप० > मराठी.

अंतर्वर्तुळ बहिर्वर्तुळ या सिद्धांतानुसार आर्यभारतीय भाषांचे जे साम्यभेद ग्रिअर्सननें नमूद केले आहेत त्यांचा तपशील येथें लक्षांत घेण्याची आवश्यकता नसली तरी त्यांतील जो प्राकृतिक फरक त्यांनी दाखविला आहे त्याचा उल्लेख करणें अवश्य वाटतें. मूळ प्रत्ययी (synthetic) आर्य भाषेचा विकास होतां होतां आज अंतर्वर्तुळांतील पश्चिम हिंदी ही मुख्यतः अप्रत्ययी (analytic) बनलेली आहे. परंतु बहिर्वर्तुळांतील भाषा ह्या आपलें नवें अप्रत्ययी रूप टाकून पुनः थोड्याफार नव्या रीतीनें प्रत्ययी बनूं पाहात आहेत. अर्थात् बऱ्याच नामरूपांच्या बाबतींत त्या अजून

६. Indian Antiquary, Vol. 32, p. 181.

७. वस्तुतः गुज. व राजस्थानी या बाह्य वर्तुळांतील भाषा, परंतु मथुरेचे शौरसेनी भाषिक जेव्हां सौराष्ट्रांतील द्वारकेकडे वळले तेव्हां गुजराथ व राजस्थान येथेंहि शौरसेनीचा पगडा अधिक बसला.

अप्रत्ययीच आहेत हें खरें पण आख्यातांच्या बाबतींत मात्र त्या प्रत्ययी बनलेल्या आहेत.[८] परंतु या बाह्य वर्तुळांतील भाषांतहि मराठी ही आपल्या शेजारणीपेक्षां अधिक सनातनी ( more conservative ) आहे,[९] हें स्टेन कोनौ यांचें मतहि चिंतनीय आहे. ग्रिअर्सननें आर्यभारतीय भाषांची भाषिक साम्यभेदांच्या साह्यानें केलेली वर्गवारी ही अशा प्रकारची आहे. ती पुनः एकदां सारांशानें मांडावयाची झाली तर अशी मांडतां येईल:--

अंतर्:- गंगेच्या दुआबांतली अंतर्भाषा : पश्चिम हिंदी.

अंतर्-बहिर् ( मिश्र ):- पूर्व पंजाब, गुजरात, राजपुताना, अयोध्याप्रांत; येथील भाषा: पंजाबी, गुज०, राज०, पूर्व हिंदी.

बहिर्:- पश्चिम पंजाब, सिंध, मराठी प्रदेश, ओरिसा, बिहार, बंगाल, आसाम; येथील भाषा:— लांठी, सिंधी, मराठी, ओरिया, बिहारी, बंगाली, व आसामी.

होर्न्ले यांचा आर्यभारतीय भाषांबाबतचा जो 'अंतर्-बहिर्-वर्तुळ' सिद्धांत ग्रिअर्सन यांनीं भाषा-शास्त्रीय कारणें देऊन पुरस्कारिला, तोच सिद्धांत रामप्रसाद चंद यांनीं ( जरी तपशीलाच्या बाबतींत त्यांचा थोडा मतभेद असला तरी ), मानववंशशास्त्राच्या आधारें सिद्ध केला आहे. ( पाहा: The Indo Aryan Races, Part I ). चंद यांच्या मताप्रमाणें अंतर्वर्तुळांतील आर्य लांब डोक्याचे होते ( Dolichocephalic ) तर बहिर्वर्तुळांतील आर्य हे लहान डोक्याचे ( Bracycephalic ) होते. मानववंशशास्त्रदृष्ट्या त्यांच्यांत मूलभूत फरक होता तो हा. जातकुळींतील या फरकाप्रमाणें त्यांच्या भाषेंतहि फरक होता. अंतर्वर्तुळांतील लांब डोक्याचे लोक म्हणजे पंजाब मधील पंजाबी राजपुतान्यांतील रजपूत, व मध्यदेशांतील गंगेच्या खोऱ्यांतील ब्राह्मण यांचे पूर्वज होत. यांच्यामध्येंच वैदिक संस्था, वैदिक संस्कृति व वर्णाश्रमपद्धति निघाली व वाढली. बहिर्वर्तुळांतील लहान डोक्याच्या आर्यांना वैदिक संस्कृति माहित नव्हती म्हणजे ते अवैदिक होते, आणि म्हणून त्यांच्या धार्मिक कल्पनेंतून वैष्णवपंथ व शक्तिपंथ निघाले. कालांतरानें, अर्थात् त्यांच्यावरहि वैदिक आर्यांचा प्रभाव पडला ही गोष्ट वेगळी. परंतु ही गोष्ट घडली ती पश्चिम पंजाब, सिंध, गुजरात, महाराष्ट्र, तसेच बिहार, ओरिसा, बंगाल येथें त्यांची वस्ती होऊन अनेक शतकें उलटून गेल्यावर. या प्रदेशांत त्यांच्या आधींपासून द्राविड व कोल यांचीहि वस्ती होती. हेंहि येथें लक्षांत घेतलें पाहिजे. साहजिकच गुजराती, मराठी व त्याचप्रमाणें बंगाली, बिहारी, व ओरिया या भाषा बोलणाऱ्यांच्या रक्तांत लांब डोक्याच्या आर्यांप्रमाणेंच लांब डोक्याच्या द्राविडांचेंहि मिश्रण झालेलें आहे.

होर्न्ले–ग्रिअर्सन यांच्या सिद्धांताला या प्रकारें चंद यांनीं मानववंशशास्त्राचा पुरावा दिला असला तरी कांहीं बाबतींत त्यांनीं आपला मतभेदहि व्यक्त केला आहे. उदा० वैदिक काळांत पंजाब व अयोध्या प्रांतांत राहणाऱ्या लोकांची भाषा मध्यदेशीय लोकांच्या भाषेहून भिन्न होती ह्या म्हणण्याला आधार नाही.[१०] तसच पूर्व पंजाब, गुज०, राजपुताना व अयोध्या येथें मिश्र (अंतर+बहिर्) भाषा जी आढळते त्याचें कारण मध्यदेशांतील लोकांनीं या प्रदेशावर स्वारी केली हें नसून मगधादि 'बाह्य भाषिक प्रदेशांतील लोकांनीं आपली भाषा वरील मिश्रभाषिक प्रदेशावर आणली हें आहे.[११] त्याचप्रमाणें 'बाह्य' प्रदेशांतील लोक आधीं आले, व मगध, अंग, पुण्ड्र येथील लोक नंतर आले, हें ग्रिअर्सनचें मतहि निराधार आहे.[१२] आणि म्हणून चंद यांनीं असा निष्कर्ष काढला आहे कीं जेव्हां 'Homo Alpinus' प्रकारचे लोक ( म्हणजे गुलाबी गोरा रंग, मध्यम बांधा, उठून दिसणारें नाक, सरळ लांबट चेहरा, पिंगट विपुल कुरळे केस, व brachecephalic

८. B. S. O. S. Vol. I; no. 2; p. 65.

९. Sten konow : Indian Antiquary Vol. 32; 191.

१०. R. Chand : 'the Indo. Aryan Races' – p. 48 & 53

११. कित्ता : पा. ५८.

१२. ,, पा. ७५.

म्हणजे लांब डोक्याचे लोक ) हिंदुस्थानांत आले तेव्हां गंगेच्या खोऱ्यांतील मध्यदेशांत वैदिक आर्यांची वस्ती असलेली त्यांना दिसली. आणि म्हणून त्यांची पहिली तुकडी गंगेच्या खोऱ्याच्या दक्षिणेकडून बिहारमध्यें स्थायिक झाली. त्यानंतर आलेल्या टोळया म्हणजे रास्टिक किंवा रट्ट यांच्या; त्या काठेवाड ( सौराष्ट्र ) व दक्षिणदेश येथें स्थायिक झाल्या. या प्रदेशाला सौराष्ट्र व महाराष्ट्र हीं नांवें पडलीं तीं यानंतर आलेल्या टोळ्यांतील लोकांवरूनच.[१३] ( चंद यांचें हें मत महाराष्ट्रांच्या आर्यीकरणाच्या प्रारंभकालावर प्रकाश पाडावयालाहि उपयोगी पडणारें आहे. विंध्य पर्वत ओलांडून दंडकारण्यांत आर्यांनीं केव्हां वस्ती केली हा जो एक कूट प्रश्न भाषाशास्त्रज्ञांना पडलेला आहे व त्यासाठीं भांडारकरांदि विद्वानांनीं जे अनेक दाखले दिले आहेत त्यांत या मानववंशशास्त्राचा आधार बराच महत्त्वाचा मानावा लागेल. )

### ‘ अंतर्-बहिर्-सिद्धान्ताला ’ धक्का देणारें मत

होर्न्ले, ग्रिअर्सन व चंद यांनीं याप्रकारें आपापल्या परीनें आर्यभारतीय भाषांची ‘ अंतर्-बहिर्’ अशा प्रकारें वर्गवारी सिद्ध करून दाखविली असली, तरी सु. कु. चतर्जी यांना ती पटत नाहीं. ग्रिअर्सन यांनीं दिलेलीं भाषिक कारणें जशीं त्यांना पुरेशीं वाटत नाहींत, तशींच चंद यांनीं दिलेलीं मानुषशास्त्रीय कारणेंहि त्यांना मान्य नाहींत.[१४] ग्रिअर्सन यांनीं दिलेलीं कारणें नंतरचीं आहेत; तसेंच आधुनिक भाषांतील आजच्या कांहीं लकबा मुळांत नसण्याचीहि शक्यता आहे, असें त्यांचें म्हणणें. त्याचप्रमाणें मराठी, गुज० वगैरे लोक प्रागृइतिहासकाळांत ‘ बहिर् ’ आर्य व द्राविड यांच्या मिश्रणापासून निर्माण झाले या चंद यांच्या मताला निर्णायक पुरावा काय? ते म्हणतात : “The hypothetical brachycephalic hordes from central Asia as forming one of the elements in the Gujarati, Marāthā, Kodugu, Kannada, Telagū, Oriyā, Bengāli & Bihāri peoples might never have been Aryan speakers. It is to be noted that the Telagu, Kannad & Kodugu peoples who are supposed to be the result of exactly the same ethnic mixture as the Gujarāti & Bengāli never spoke Aryan.” आणि म्हणून “The attempt to establish on anthropometrical & ethrological grounds a ring of Outer Aryandam round an ‘Inner’ Aryan core is as unconvincing as that on linguistic grounds.”[१५]

सुनीतिकुमार चतर्जी यांनीं एतत्संबंधांत वेबर वगैरेंना मान्य असणारी उपपत्ति सुचविली आहे. तिचाहि येथें विचार करणें अगत्याचें आहे. या उपपत्तीप्रमाणें आर्य लोक हिंदुस्थानांत आले, ते फक्त दोनच टोळ्यांनीं आले असें न मानतां अनेक टोळयांनीं आले असें मानावें लागतें. त्यांपैकीं कांहीं टोळया परस्पराशीं साधर्म्य दाखविणाऱ्या होत्या. त्यांच्यातलें हें साधर्म्य त्यांच्यांतील वंशसंबंधामुळें उतरलेलें असो, वा समान पद्धतीनें त्यांचा विकास झाल्यामुळें आलेलें असो, किंवा परस्परावर होणाऱ्या परिणामामुळें आलेलें असो. परंतु त्यांच्यांत भाषिक साधर्म्य आढळतें, एवढें खास. या साधर्म्यानुसार त्यांची वर्गवारी खालीलप्रमाणें होईल[१६] :–




A, B, C, D, वगैरे बोलभाषा म्हणजे भारतांत आलेल्या आर्यांच्या निरनिराळ्या बोलभाषा. या बोलभाषांपैकीं एका भाषेवर मुख्यतः आधारलेली प्रमाण ग्रांथिक भाषा म्हणजे ऋग्वेदांतील भाषा. ऋग्वेदांतील प्रमाण भाषेंत इतर वैदिक बोलींच्या खुणा सांपडतात

१३. रामप्रसाद चंद : कित्ता- पा. ७५

१४. S. K. Chattergi : Origin & Development of Bengali; Introduction; pp. 32,33.

१५. कित्ता – पा. ३३

१६. S. K. Chattergi : Origin & Development of Bengali – Intro. p. 33







त्याचें कारण हें. अनेक बोलभाषांतून जेव्हां प्रमाण ग्रांथिक भाषा बनते तेव्हां असेंच कोणत्या तरी बोलीला महत्त्व[१७] येतें. व वेदांत आढळणारी ‘छंदसि’ भाषा जी आहे, ती मुख्यतः पश्चिम हिंदुस्थान (म्हणजे पंजाबांत वा उदीच्य देशांत) स्थायिक झालेल्या वैदिक आर्यांची बोलभाषा. या भाषेचा विशेष हा कीं तिच्यांत ‘र’चा उच्चार होई; पण ‘ल’चा होत नव्हता. स्वरमध्यस्थ वा मध्यस्थ घ्, झ्, ध्, भ्, यांचा उच्चार ‘ह’ होई. उदा. ‘यजामहे [ < यझामधे (अवेस्था) ]. पश्चिमेकडच्या व विशेषतः ऋग्वेदांत ग्रांथिक महत्त्व लाभलेल्या वैदिक बोलींत ‘र’चा उच्चार व ‘ल’च्या उच्चाराचा अभाव, या ज्या दोन्ही गोष्टी आढळतात त्या इतर वैदिक बोलीत आढळत नाहींत. इतर वैदिक बोलीत ‘र’ आणि ‘ल’ या दोहोंचाहि उच्चार होई, तर कांहींत फक्त ‘ल’ च उच्चारला जाई. नंतरच्या प्राकृत भाषांनाहि या उच्चारांचे पडसाद ऐकूं येतात; उदीच्य, मध्यदेशीय, व प्राच्य या भाषांशीं त्यांचा अनुक्रमें संबंध दाखवितां येतो. ऋग्वेदांत ग्रथित झालेल्या वैदिक बोलीप्रमाणें त्याकाळीं इतरहि वैदिक बोली असल्या पाहिजेत हें यावरून स्पष्ट होतें. त्यापैकीं कांहीत ‘ड’ चा उच्चार होई; तर कांहींत ‘ड’ चा ‘ळ’ होई. ‘गुरु’ शब्द एका बोलींत ‘गुरु’ असाच उच्चारला जाई, तर दुसऱ्या बोलींत ‘गरु’ असा उच्चारला जाई. पाली व नंतरच्या प्राकृतांतहि ‘गरु’ असाच उच्चार आढळतो. ‘दा’ धातूचीं ‘ददाति’–‘दत्त’ हीं रूपें वैदिक संस्कृत व संस्कृत ज्या बोलींतून तयार झाल्या त्यांत सरसहा येत. परंतु ‘दाति’ व ‘दित’ हीं रूपेंहि इतर बोलींत रूढ असावींत. आणि आधुनिक भारतीय भाषांत जीं रूपें उतरलीं आहेत तीं या ‘दाति–’ ‘दित’ पासूनचींच आहेत. उदा० देति > दिइ, देय; दित > दिय > दिया (हिंदी०); दिलं (बेंगाली, मराठी) वैदिक भाषेंत अनेक बोली होत्या हें यावरून स्पष्ट होईल. अर्थात त्या एकाच भाषेच्या बोलभाषा असल्यानें त्यांच्यांत फरकांपेक्षां सारखेपणाच अधिक होता, आणि म्हणून नंतरच्या प्राकृतभाषा व त्यांच्याहि नंतरच्या आधुनिक भारतीय भाषा या सर्वांची गंगोत्री म्हणून ऋग्वेदांतील वैदिक भाषा मान्य करावयाला हरकत नाहीं. आजच्या भाषांत वा प्राकृत भाषांत जे साम्यभेद आढळतात त्याचें कारण चतर्जी म्हणतात त्याप्रमाणें जर वैदिक आर्यांत असणारें अनेक बोलींचें अस्तित्व (जें वर उल्लेखिलें आहे) मान्य केलें – आणि मान्य करावयाला हरकत नाहीं हें वर सांगितलेंच आहे––तर मग होर्न्ले, ग्रिअर्सन व चंद यानीं प्रतिपादिलेला आंतर्–बहिर् कुलाचा सिद्धांत मानण्याची आवश्यकता दिसत नाहीं.

---

१७. मराठींत जेव्हां प्रथम ग्रंथरचना झाली, तेव्हांहि असाच प्रकार घडला, याची येथें आठवण व्हावी. महाराष्ट्रांतील अनेक बोलीपैकीं देशावरच्या वा पुणें प्रांतीच्या विशिष्ट शिष्ट बोलीला जें ग्रांथिक प्रमाण भाषा म्हणून महत्त्व आलें, तें मराठीचे प्राचीन मातबर ग्रंथकार ती भाषा बोलणारे होते म्हणून. ज्ञानेश्वर आळंदीचा, तुका देहूचा, रामदास साताऱ्याजवळील सज्जनगडचा. स्वराज्याच्या काळीं व तदनंतर अव्वल इंग्रजींतहि पुण्याचें केंद्रस्थान टिकूनच होतें. विशिष्ट ठिकाणच्या व विशिष्ट वर्गाच्या बोलभाषेला महत्त्व येतें तें या प्रकारें; अर्थात ही विशिष्ट बोलभाषा प्रमाण बनली तरी ती आपल्यांत इतर बोलभाषांच्या लकबा सामावून घेत असतेच. आजच्या ग्रांथिक मराठींतहि याचा आपल्याला प्रत्यय येतो.








प्रा. रा. ग. जाधव

# आधुनिक मराठी कवितेंतील वास्तवाचें आकलन

चिरंतनाच्या चिंतनांतूनच मराठी कवितेचा जन्म झाला व आजवर ती परंपरा कायम टिकली. कालगतीप्रमाणें चिंतनाचे विषय बदलले खरे, पण हेंहि मराठी कवितेच्या लोकाभिमुख प्रकृतीमुळेंच होय. सर्वांगानें विकसित होणाऱ्या वास्तवाचे विविध लक्षणीय घटक मराठी कवितेंत सामावून गेले. पण यांतहि प्राधान्यविवेक होता व वास्तवदर्शनाच्या पातळींची अनेकविधता होती.

केशवसुतांपासून वैचारिक मराठी कविता संपूर्णपणें बदलली, गतिमान वास्तवाच्या लक्ष्याकडे कूच करतांना तिनें रूळ बदलले. स्वातंत्र्य, समता, बंधुता हीं नवीं मूल्यें तिच्या आविष्कारांत दिसूं लागलीं. हीं मूल्यें ज्ञानेश्वर तुकारामांनीं महाराष्ट्राला दिलीं नाहींत असें नाहीं, पण केशवसुतांनी या मूल्यांचे वास्तवाशीं असलेले स्पर्शबिंदु दाखवून दिले. एवढेंच नव्हे तर, त्यांवर भर ( Emphasis ) दिला. माणसाच्या अंतिम अभ्युदयाशीं निगडित झालेलीं हीं तत्त्वें स्थलकालातीत असतात व त्यांचा आविष्कार ही प्रत्येक युगांतील मानवी गरज ठरते. परंतु या मूल्यांची सामाजिक पार्श्वभूमि प्रथम केशवसुतांनींच प्रभावीपणें निर्माण केली व त्यांना समुचित कोंदणांत बसवून त्यांच्या नवदीप्तीचा साक्षात्कार घडविला.

केशवसुतांनी विराट वास्तवाची ओजस्वी कविता लिहितांना एक व्यवधान राखलें होतें. तें म्हणजे तत्कालीन प्रत्यक्ष परिस्थितीशीं स्पष्ट असें अनुसंधान! परंपरागत अशीं 'गतशतकांचीं घोर पापें' त्यांनीं निर्भयपणें कवितेंतून मांडलीं. यासाठीं आवश्यक त्या परिवर्तनशील नियमनाचा धडाडीनें उद्घोष केला. त्यांचा 'नवा शिपाई' रांगडेपणानें नव्या मनूचें आवाहन देत पुढें आला.

वास्तवाच्या आकलनांत केशवसुतांनी तत्कालाचा संदर्भ उभा केला व म्हणूनच एक प्रकारची बौद्धिक प्रत्ययक्षमता त्यांच्या कवितेंत दिसून आली. त्यांनी एकच मजूर निवडला, एकच भारतीय टिपून घेतला, विद्यार्थी, अंत्यज, नैऋत्येकडचा वारा, वातचक्र, पद्यपंक्ति हे सर्व त्यांच्या कवितेंत वास्तववादी चिंतनाचें एक एक स्फुल्लिंग घेऊन अवतीर्ण झाले. तत्कालीन वास्तवाच्या ग्रहणांत त्यांनी एक भारतीय म्हणून आपली भूमिका स्पष्ट करून घेतली. वास्तवाच्या ग्रहणाची ही पातळी अभावितपणें त्यांच्या आविष्कारपद्धतीवर व तिच्या परिणामकारकतेवर ठसा उमटवून गेली. सामाजिक परिस्थितीचा अशाश्वत तपशील तिच्यांत आला. एवढेंच नव्हे तर, या अशाश्वत तपशीलाच्या आधारानेंच त्यांनी चिरंतनाचें बौद्धिक प्रतिपादन केलें. वैश्विक जाणीवेचा पुरस्कार करतांनाहि त्यांचा नवा शिपाई भारतीय स्वयंकेंद्रितता सोडूं शकला नाहीं. या भारतीय 'स्व' नेंच नव्यां वास्तवाचें केलेलें क्रांतदर्शी प्रतिपादन हेंच केशवसुतांच्या आलोचनात्मक कवितेचें सार आहे.

रविकिरण–मंडळाची दृष्टि वास्तवाच्या चिंतनापेक्षां त्याच्या दर्शनांतच [ कीं प्रदर्शनांत ? ] अधिक रमून गेली होती. राजकीय पारतंत्र्याचें सर्वंकष शल्य या मंडळाच्या कवितेंत वेगवेगळ्या संदर्भांत मांडलें गेलें, तरी या मांडणींत बुद्धिप्रधान आंदोलन नव्हतें. बौद्धिक आवाहन नव्हतें, वैचारिक उलथापालथ नव्हती. सामान्य स्वरूपाच्या भावनिक कुचंब-






णेचें ओजस्वी उदात्तीकरण होतें. मूल्यप्रतिष्ठापनेशीं भावनिक कल्लोल मूलतः संवादी नसल्यानें रविकिरण-मंडळ विराट वास्तवाच्या ग्रहणांत नवीन भर घालूं शकलें नाहीं.

## कुसुमाग्रजांची कविता

कुसुमाग्रज व त्यांचा अग्निसंप्रदाय यांच्या वास्तवदर्शी कवितेंतहि मूलगामीचिंतनापेक्षा सद्यः-स्थितीचीं चित्रमय विधानेंच अधिक आढळतात. मात्र त्यांच्या वास्तवाला भारतीय परंपरेंत पूर्वी स्थान नव्हतें. साम्राज्यवाद व साम्यवाद यांचा कलह भारतीय विचारपरंपरेत नवाच होता. या कलहाचें रेखाटन करतांना याहि परंपरेंतील कवींना सामाजिक परिस्थितीचा संदर्भ उभा करावा लागला. मात्र हा संदर्भ देतानां आत्यंतिक आलंकारिकता या कवींनीं स्वीकारली. या आलंकारिकतेमुळेच वास्तवाचें अनुसंधान थोडेसें सुटलें व त्याला एक प्रकारची नको ती वैश्विक पातळी लाभली. या सूक्ष्म विकृती-मुळें ही कविता अधिक प्रत्ययकारी झाली तरी केशवसुतांच्या कवितेला जें तत्कालाचें निशाण सापडलें, तसें तें या कवितेला सापडलेलें दिसत नाही. 'मातीची दर्पोक्ति', 'आगगाडी व जमीन', 'अहिनकुल', 'गर्जा जयजयकार', 'पाचोळा' या कवितांना कालाचें कोंदणच लाभलें नाहीं.

अधिक बारकाईने पाहिलें तर असें दिसेल की अग्निसंप्रदायांतील तेजस्वी कवींची कविता ही एक प्रकारच्या वास्तवनिरपेक्ष ध्येयवादाचीच कविता ठरली. वास्तवता ही नेहमींच कलहवती असते व या कलहावर युयुत्सु वृत्तीने विजय मिळवायचा असेल तर एक प्रकारच्या प्रखर ध्येयवादाची आवश्यकता असते. अशा प्रकारच्या भूमिकेवरूनच कुसुमाग्रजादि कवींनीं क्रांतीचीं गर्वगीतें लिहिलीं. हीं लिहितांना एक प्रकारची प्रच्छन्नपणे कलहापासून दूर राहणारी अलिप्तता त्यांना ठेवावी लागली. या अलिप्ततेच्या पातळीवरच त्यांना आलंकारिक व चित्रमय कवितांचा आधार घ्यावा लागला.

आज पाऊणशें वर्षांनंतरहि केशवसुतांच्या कवितेंत तत्कालीन विराट वास्तवाची कल्पना आणून देणारी जी प्रभावी प्रत्ययक्षमता आहे, तशी ती कुसुमाग्रजादि कवींच्या कवितेंत राहील कीं नाही याची मला शंका वाटते. या कवींची कविता परिणामकारक आहे, ही त्यांतील आलंकारिकतेने व्यापक केलेल्या मानवाच्या मूलभूत कलहाच्या दर्शनानेंच होय. या दर्शनानें मराठींतील वास्तवदर्शी कवितेचें क्षितिज विस्तृत केलें याबद्दल शंकाच नाही. पण या वास्तवदर्शनांत एक प्रकारचा साधेपणा, सरळपणा जाणवतो. आलंकारिक मांडणीमुळें चिंतनाचा वावच खुंटून जातो. वैचारिक आंदोलनांना खीळ बसते. वातचक्र ज्याप्रमाणें क्षणभर गरगरतें, थोडेसें उधाण पावून पुन्हां कलात्म समाधानानें संपतें, तसेंच या कवितांचें होतें.

खरें पाहिलें तर या कवींच्या कवितेंत ऐकांतिक ध्येयवादाचा कळत नकळत पुरस्कार केला गेला. 'सत्यमेव जयते।' या सनातन तत्त्वाप्रमाणेंच 'ध्येयवादो विजयति।' अशा प्रकारचा सनातन अट्टाहास या कवितेंत दुमदुमत राहिला. ध्येयवादाच्या अवलंबनांतच अनुस्यूत असलेला अभिनिवेशी विजयोत्साह त्यांच्या वास्तवदर्शनांत प्रकट झाला. साम्राज्यवाद व नवा साम्यवाद यांच्या अभूतपूर्व संघर्षानें निर्माण झालेलें अभिनव वास्तव चित्रित करतांना असल्या तात्त्विक बैठकीचा आधार घेतला गेला. 'ध्येयवादो विजयति।' या गृहीत तत्त्वाने म्हणूनच या नव्या वास्तवाचें आकलन करतांना एक प्रकारचा एकेरीपणा या कवींच्या कवितेंत दिसून येतो. या गृहीततत्त्वाच्या सुवर्णरथांत बसून वास्तवाचें सर्वंकष सत्य मात्र दूर पळून गेलें. या सत्याचा त्रुटित तपशील मात्र चित्रमय वर्णनांच्या व ओजस्वी शैलीच्या आवरणाखालीं नटून थटून आपल्यापुढें



अनुक्रमणिका






आला. दलितांचा लिलाव दिसला व खडखडत जाणाऱ्या आगगाडीखालीं चेंगरून गेलेली जमीनहि दिसली. क्रांतीचा जयजयकार उमटला व पाचोळयाची दीनदशा पहावयास सांपडली.

ध्येयवादाच्या या अभिप्रेत श्रेष्ठपणाच्या पातळीवरून या संप्रदायानें केलेलें वास्तवदर्शन डोळस वस्तुनिष्ठेच्या पातळीवर येणेंच शक्य नव्हतें. एक प्रकारची ऐतिहासिक अशक्यता यामागें होती हें स्पष्ट आहे. ध्येयवादाचा प्रांत हा स्थितप्रज्ञांचा प्रांत होय. यांत एकवेळ भावनिक प्रक्षोभ समावूं शकेल, नव्हे, ध्येयवादाचा झेंडा उंच राखण्यासाठी भावनाप्रक्षोभ माजविण्याचा प्रयत्न जाणीवपूर्वक केला जाणेंहि शक्य आहे. पण ध्येयवादाचें प्रांगण वैचारिक आंदोलनांना खुलें नाहीं व नसतेंहि! कुसुमाग्रजादि कवींची कविता वास्तवदर्शनाच्या दृष्टीनें येथे पूर्णपणें चकली. त्यांच्या कवितेंत विवेकाला ग्रासू पाहणारें मर्मभेदक वास्तवदर्शन नाहीं. भारतीय जीवनाच्या सर्वांगानां घेरूं पाहणारी नवी वस्तुनिष्ठा व तिचे खोलवर होणारे परिणाम पाहण्याची, जोखण्याची अंतर्दृष्टि त्या कवितेंत नाही. साम्राज्यवाद व साम्यवाद याच्या कलहाचा वास्तविक तपशीलहि काव्यगत होऊन प्रकट झालेला नाही. या कलहक्षम वास्तवाचीं युगसापेक्ष पिसें उपटून, त्याला चिरंतन मूल्यांच्या कलहाचे रूपेरी पेहराव देण्यांतच या कवींची कविता दंग झाली. मराठी कवितेची वास्तवग्रहणाची शक्ति वाढली खरी, पण ती वस्तुनिष्ठ पातळीवर गेली नाही. वैचारिक प्रक्षोभ माजविण्याची कुवत या कवितेंत नव्हती. वास्तवाची कठोर मीमांसा करण्याची दृष्टि नव्हती.

**' स्व आणि वास्तव '**

मर्ढेकरांच्या कवितेने एक नवें वास्तवदर्शन घडविलें. यासाठी त्यांनी एक नवा चष्मा तुमच्या आमच्या डोळयांवर ठेवण्याचा प्रयत्न केला. यंत्रयुगाच्या भयानक अंतर्विरोधाची त्यांनी समीक्षा केली. त्या युगाचा एक नवा अर्थ दाखवून दिला. आणि असें करतांना एक क्रांतिकारक पवित्रा टाकून त्यांनी मराठी कवितेचें वास्तवदर्शी स्वरूप बदलण्याचा एक नवा मार्ग रूढ केला.

या नव्या बदलाचें सूत्र होतें तें, ' स्व आणि वास्तव ' असें! केशवसुतांपासून कुसुमाग्रजांपर्यंत मराठी आलोचनात्मक काव्यांत या एकुलत्या एक ' स्व'ला वाव नव्हता, तो प्रथम मर्ढेकरांनीं उपलब्ध करून दिला. केशवसुतांचा ' मी ' हा ' स्व ' पुरताच सीमित नव्हता, तर तो एक भारतीय ' मी ' होता व म्हणूनच परंपरेच्या सर्व अंगांनी विबद्ध होता. कुसुमाग्रजादि कवींच्या सामाजिक ध्येयवादांत ' मी'ची संपूर्ण विस्मृति होती. मर्ढेकरांचा ' मी ' हा युलिमिसप्रमाणें एक विश्वसंचारी ' मी ' होता. या ' मी'ला परंपरेची रक्तखूण नव्हती, तसेंच हा मी कुठल्याहि विशिष्ट गटाचा अनुयायी नव्हता. हा ' मी ' म्हणजे खऱ्याखुऱ्या अर्थानें ' बाळ सीताराम मर्ढेकर, ही व्यक्ति होता. या व्यक्तीनें घेतलेलें वास्तवदर्शन हीच मर्ढेकरांची काव्यप्रेरणा होती.

मर्ढेकरांनी अशा प्रकारें वास्तवाचें व्यक्तिनिष्ठ आकलन मराठी कवितेंत आणलें. व्यक्तीच्या बौद्धिक संचितानुसार हें आकलन विभिन्न ठरणें म्हणूनच अपरिहार्य होतें. मर्ढेकरांना पृथ्वीची तिरडी वाहण्याची तगमग लागली होती आणि महासागराला भंग्याचें कर्तव्य सांगण्याची आंच होती. मर्ढेकरांचें वास्तवदर्शन म्हणूनच धक्का देणारें, भ्रांत करणारें ठरतें. त्यांतील विखारी उपरोधानें विचार सुन्न झाला. आत्मसंशोधनाची उबळ आली. बिचकून भवतालाकडे पाहण्याची दृष्टि लाभली. या सगळया वैचारिक उलथापालथींतून निष्पन्न काय झालें हा प्रश्न अगदी वेगळा! पण मर्ढेकरांच्या कवितेचें आवाहन मूलत: विवेकाला व तिचा रोख विशिष्ट दृष्टिकोनांतून गवसलेल्या वास्तवाकडे होता.



अनुक्रमणिका

विराट व गतिमान वास्तवाच्या बौद्धिक ग्रहणांत मर्ढेकरांनीं नवा व्यक्तिवादी पंथ सुरू केला. पण व्यक्तिगत पातळीवर या वास्तवाला योग्यसा वाव मिळणें शक्यच नव्हतें. त्या पातळीवर ही विराट वास्तवता पार चेंगरली, गुदमरली. तिला आपल्या लफ्फेदार विविधवसनांना सावरून निरवून अंग चोरून बसावें लागलें. वास्तवाची ही कोंडी फोडण्यासाठीं मर्ढेकरांनीं या व्यक्तीची बैठकच ऐसपैस करण्याचा प्रयत्न केला. या व्यक्तिवादी दृष्टिकोनाचें विश्वीकरण करण्यांत आलें. युगधर्माची व नव्या वास्तवाची खरीखुरी मर्मदृष्टि असल्याची ग्वाही या व्यक्तिवादी कवितेनें दिली. युगंधराचा मनोगंड या कवितेंत दिसून आला. युगपरंपरेच्या जाणीवेचा वारसा या कवितेनें सांगितला.

मर्ढेकरांच्या वास्तवदर्शी कवितेंत याचमुळें यांत्रिकता आली. विकसनशील वास्तवाचा एकच एक घटक या कवितेने नव्या नव्या प्रतिमांतून ग्रथित केला. याचबरोबर या विशिष्ट वास्तवानें भारावून गेलेला ( Obsessed ) एक माणूस ( म्हणजे मर्ढेकरांचा ' मी ' ) वैचारिक कोलाहलाच्या त्याच त्याच वादळांत सापडूं लागला. वास्तवाचें बौद्धिक आकलन करतांना अखेर संज्ञाशून्य मानवाच्या अर्थशून्य जीवनाचा ठराव मर्ढेकरांनी मांडला. बुद्धीनेंच बुद्धीची ग्राह्यता अमान्य केली. एक प्रकारच्या विराट पीडेच्या मनोगंडाने मर्ढेकरांनी वास्तवाचें शिल्प उभें केलें. या पीडेला मर्ढेकरांनी गृहीत धरलेला प्रक्षोभक अर्थ होता. त्यांच्या कवितेंत या पीडेचा आकाशव्यापी कल्लोळ आहे.

मर्ढेकरांच्या वैचारिक वास्तवग्रहणाला म्हणूनच आत्यंतिक व्यक्तिनिष्ठा आली. वास्तवाच्या बौद्धिक आकलनांत व आविष्कारांत व्यक्तिस्थितीचा जो सुसंवादी समतोल असावा लागतो, तो त्यांच्या कवितेंत नाहीं. याचमुळें त्यांच्या विवेकप्रधान कवितांतहि एक प्रकारचा अविवेक लगडून राहिला. मात्र त्यांच्या कविता प्रत्ययकारी ठरल्या त्या मात्र याच अविवेकाच्या अस्तरामुळें ! कारण त्या अविवेकामागें मर्ढेकरांचें तडफडणारें व्यक्तिमत्त्व उभें आहे. एक प्रकारची प्रामाणिक पराभूत वृत्ति आहे. एक प्रकारचा प्रखर शून्यवाद आहे. या एवढ्या प्रामाणिक व प्रखर निष्ठेवर आधारलेली कोणाचीहि कोणतीहि कविता परिणामकारक झाल्याखेरीज राहणार नाहीं. मर्ढेकरांच्या कवितेंत अशीच प्रखर परिणामकारकता जाणवते.

सूक्ष्मपणें पाहतां असें दिसेल कीं मर्ढेकरांच्या कवितेंतील वास्तवविचार हा एका बौद्धिक नकाराच्या आधारानें आलेला आहे. मानवी संस्कृतीच्या विकासक्रमांत उपलब्ध झालेलें आजचें वास्तव हें एका प्रभावी पतनबिंदूशीं उभें आहे व या बिंदूचें बाह्यरूप विदूषकी तर अंतस्वरूप विदारक आहे अशा प्रकारच्या एका अटकळीने त्यांनी आसमंताची समीक्षा केली. ही समीक्षा विलक्षण निर्भयतेनें त्यांनीं कवितेंतून प्रतिपादन केली. अशा प्रकारच्या वास्तवग्रहणाला व त्याच्या निर्भय आविष्काराला आवश्यक तेवढी विवेकदृष्टि त्यांच्या व्यक्तिवादी कल्पनेंत अंतर्भूत होते, हें स्पष्टच आहे. म्हणूनच भावनाविचारांचा एक संमिश्र रसभाव त्यांची कविता निर्माण करते. भावना विचारांकित केव्हां होते व विचार भावनाधीन कधीं होतात याचें ज्ञानहि वाचकाला स्पष्टपणानें होत नाहीं. मराठी मीमांसात्मक ( Interpretative ) काव्याला अशा प्रकारच्या भावनाविचारांच्या गूढ धुक्यांत नेऊन ठेवण्याचें कार्य प्रथम मर्ढेकरांनीच केलें. मात्र हें कार्य त्यांच्या उज्ज्वल प्रतिमेनें प्रत्ययक्षम केलें हें विशेष होय.

मर्ढेकरांच्या या व्यक्तिवादी अस्मितेचें असें वैश्विक पसरण वास्तवाच्या एका विशिष्ट समीक्षेच्या पोटीं जन्माला आलें, हें स्पष्ट केलें पाहिजे. केशवसुतांनीं या व्यक्तिवादी अस्मितेचें विश्वीकरण केलें असलें, [ पाहा : " विश्वाचा विस्तार केवढा ।






ज्याच्या त्याच्या डोक्याइतुका ॥ ' ] तरी त्यामागें अशी भूमिका नव्हती हें स्पष्टच आहे. ' आम्ही कोण ', हें सांगतांना त्यांना एका व्यापक स्थलकालातीत तत्त्वाचा साक्षात्कार झाला होता. हें नव्यानें सांगण्याची गरज नाही. म्हणूनच या दोन दृष्टींतील भेद लक्षांत ठेवला पाहिजे.

## मुक्तिबोध व विंदा करंदीकर यांची कविता

मर्ढेकरानंतर शरच्चंद्र मुक्तिबोध व विंदा करंदीकर यांनी मराठी आलोचनात्मक कवितेची परंपरा पुढें चालू ठेविली. पैकीं मुक्तिबोधांनी आपल्या वैचारिक प्रणालीचें स्पष्टीकरण ' नवी मळवाट ' या त्यांच्या पहिल्या काव्यसंग्रहाच्या प्रस्तावनेंत नमूद केलें आहे.

मर्ढेकरांच्याच व्यक्तिवादी वास्तवविचाराला वरील दोन कवींनी विभिन्न स्तरांवर आंदोलित केलें. या आंदोलनांना म्हणूनच एक प्रकारचा भेदकपणा, वैचारिक प्रखरता, भावनिक गूढता व तेजस्वी शब्दकळा प्राप्त झालेली आहे.

" मला ओळखावयाला । हवें माझें स्वप्न तुला—" असें शरच्चंद्रानी ' यात्रिका 'च्या पहिल्याच कवितेंत स्पष्ट करून ठेवलें आहे. आजच्या यंत्रयुगांतील वास्तवाचे भिन्नभिन्न अंतर्विरोध त्यांनीं ज्ञात करून घेतले आहेत. हें ज्ञान किंवा आकलन एक प्रकारच्या सर्वंकष विचारप्रक्रियेवर सिद्ध झालें आहे. ही विशिष्ट विचारप्रक्रिया हेंच शरच्चंद्रांच्या चिंतनशील कवितेचें स्वरूप आहे.

मुक्तिबोधांच्या या चिंतनप्रक्रियेंत आजच्या वास्तवाचा तपशील म्हणूनच फार कमी आहे. आसमंतांतील लक्षणीय घटकांना कवितेच्या वैचारिक आवाहनांत उठाव आणण्यासाठीं हवी ती मोकळीक त्यांची कविता नाकारते. विचारवंताच्या ऐतिहासिक तर्ककठोर मीमांसेंतच रममाण होण्याची तिची प्रकृति आहे. वास्तवाच्या ग्रहणाची त्यांची ही दृष्टिसृष्टीला अन्हेरणारी विवेकप्रतिपादकदृष्टि हेंच त्यांच्या स्वप्नाचें प्रेरक स्वरूप आहे.

मुक्तिबोधांचा 'मी' आणखी एका दृष्टीनें लक्षणीय आहे. या 'मी'ला स्थलव्यापकता व कालव्यापकता या दोन्ही गोष्टी साध्य झालेल्या आहेत. त्यांच्या प्रत्येक कवितेला युगायुगाचा अर्थ आहे. त्यांची वेदना युगांची आहे. त्यांची साधना युगांची आहे. त्यांचा आशावाद युगायुगांतून प्रगत होत आला आहे. ही युगव्यापी व कालभेद करणारी ' मी ' ची वैचारिक प्रक्रिया हें शरच्चंद्रांच्या वास्तवाचें वैशिष्ट्य आहे. याबरोबरच त्यांच्या ' मराठीचिये नगरीं ' चीनचा शेतकरी व कामकरी हजेरी देऊन गेला आहे. मास्को, कीव्ह व व्होल्गा डॉन यांचीहि तेथें उपस्थिति आहे. मानवी संस्कृतीच्या विभिन्न परंपरांना गवसणी घालण्याची त्यांची धडपड आहे.

शरच्चंद्रांची ही युगव्यापी अस्मिता ही चिंतनप्रक्रियेच्या बाहेर पडलेली नाहीं. म्हणूनच मर्ढेकरांच्या एकांगी पण भावस्पर्शी वास्तवसमीक्षेची परिणामकारकता शरच्चंद्रांच्या कवितेला लाभलेली नाहीं. एक प्रकारची आत्मनिरपेक्ष चिकित्सा त्यांच्या कवितेंत आढळते. ही कविता ' स्व ' पासून सुरवात न करतां ' स्व ' पाशीं संपते. म्हणूनच एक प्रकारचा संभ्रांत करणारा भावनास्पर्श त्यांच्या वैचारिक कवितेंत आढळत नाहीं.

या आत्मनिरपेक्ष चिंतनशीलतेमधूनच त्यांची वास्तवाची अनुभूति साचेबंद झाल्यासारखी वाटते. आजच्या विराट नि विकृत वास्तवाची दखल एक प्रकारच्या ढोबळ प्रक्रियेंतून घेतल्यासारखी वाटते. या प्रक्रियेंत आजच्या आसमंतांतील तपशीलांना काट बसते. आजचा बेढंग वर्तमानकाल व उद्याचा सुरेख भविष्यकाल यांच्या कात्रींत हवालदिल झालेला आजचा माणूस एवढ्याच निष्कर्षांना वेगवेगळ्या व पुष्कळदा गूढ अशा प्रतिमांद्वारें आविष्कृत करण्यांत येतें. आजच्या वास्तवासंबंधींची-

विधानें या प्रतिमा साकार करतात. या विधानांचें बौद्धिक ग्रहण महत्त्वाचें असलें तरी त्यांत प्रमाथी आंदोलनांना वाव नाहीं. भावनांना वैचारिक आवाहन नाहीं. म्हणूनच मुक्तिबोधांची विचारप्रवण कविता तितकीशी प्रक्षोभक व परिणामकारक झालेली नाहीं. कारण एक प्रकारचा वैचारिक समतोल, एक प्रकारचा साचेबंदपणा, लक्षणीय वास्तवघटकांबद्दल असलेली अनास्था व भावनास्पर्शी उद्वेगाचा अभाव या गोष्टी त्यांच्या चिंतनशील कवितेच्या अविभाज्य घटक होऊन बसल्या आहेत.

आजच्या विस्फरित वास्तवाचें दर्शन अशा प्रकारच्या विशिष्ट प्रज्ञाप्रधान प्रक्रियेंतून घेण्याचें विंदा करंदीकरांनी मात्र टाळलें आहे. केशवसुतांचा वास्तवस्पर्श, रविकिरणमंडळाची ढोबळ वास्तवदृष्टि, कुसुमाग्रजादि कवींचे अलंकृत वास्तवनिर्देश व मर्ढेकरांचा अहंलक्षित आसमंत या सर्वांना सामग्र्यानें सामावून घेण्याची विलक्षण वास्तवदृष्टि त्यांच्या वैचारिक कवितेंत आढळन येते. याचा अर्थच असा कीं वास्तवाच्या मूलभूत स्पंदनांना त्यांनीं अतिशय संवेदनक्षमतेनें व आविष्कृतपणें आपल्या काव्यांतून वाट करून दिली आहे. आजच्या संस्कृतीचें बाह्यरूप तिच्या आंतरिक कल्लोलांसह मांडणें एवढी एकच एक वास्तवदृष्टि विंदा करंदीकरांच्या चिंतनप्रधान कवितांतून दिसते. या शुद्ध वस्तुनिष्ठ आकलनामुळेंच त्यांच्या काव्यांतील 'मी' चें विश्वीकरण अधिक प्रत्ययक्षम झालें आहे. हा 'मी' एका अर्थानें कुठल्याहि विशिष्ट विचारवादापासून विमुक्त आहे. मर्ढेकरांप्रमाणें हा मी नकारवादी नाही व मुक्तिबोधांप्रमाणें हा मी आत्मनिरपेक्ष व म्हणूनच परिणामशून्य अशा एखाद्या गणिती विचारप्रक्रियेंत भिरभिरणाराहि नाहीं. एकाच वेळीं अहंकेंद्राला व वास्तवबिंदूंना व्यापण्याची जादूगिरी या 'मी'त आहे. या अपूर्व अस्मितेचा उलगडा प्रत्यक्ष कविलाहि झालेला नाही आणि म्हणूनच 'कसा मी कळेना', असा प्रश्नांकित मोहरा असलेली पहिलीच कविता त्यांच्या 'मृद्गंधांत' आढळते.

केशवसुतांनी आपल्या विचारप्रधान कवितेंत एका विशिष्ट कालखंडाला रेखीवपणानें खोदून ठेवलें. या कालखंडाच्या वैचारिक उत्थापनाचीं लेणीं त्यांनी काव्यांतून उभारलीं. हें नवें तत्त्वज्ञान वास्तवाच्या निश्चित व निःसंदिग्ध आकलनावर आधारलेलें होतें. सांस्कृतिक विकासाच्या एका टप्प्यावर आलेल्या आसमंताला ज्या नव्या विचारांची गरज होती, ते विचार ऐतिहासिक दृष्ट्या शंकातीत होते. म्हणूनच एक प्रकारचा निश्चित वास्तवविवेक त्यांच्या कवितेंतून दिसून येतो.

मात्र केशवसुतांच्या कालखंडांतील ही वैचारिक परिस्थिति नंतरच्या कालांत फारशी टिकली नाहीं. प्रगतिशील वास्तवाच्या विभिन्न थरांत हळूहळू विसंवादी सूर उमटूं लागले. नवे नवे अंतर्विरोध निर्माण होऊं लागले. वास्तवाचें एकजिनसी स्वरूप झपाट्यानें बदलत चाललें व त्याला एक प्रकारचा भ्रांतचित्त करणारा बहुरंगीपणा येऊं लागला. वास्तवाच्या गतिमानतेंतहि प्रगति व परागति यांचे पाय परस्परांत अडकून ते कोलमडल्यासारखे दिसूं लागले.

अशाहि स्थितींत भारतीय वास्तवाचें एक वैशिष्ट्य कायम टिकून होतें. तें म्हणजे साम्राज्यवादाला बळी पडलेली आमची स्वतंत्रता ! आणि हेंच स्थूल शिखरीभूत वास्तव अधिक आवाहनप्रद वाटणें स्वाभाविक होतें. हेंच आवाहन रविकिरणमंडळ व कुसुमाग्रजादि कवि यांनी तात्काल स्वीकारलें व त्याचें चित्रविचित्र स्वरूप दिग्दर्शित केलें.

१९४० पर्यंतच्या मराठी वास्तववादी कवितांत म्हणूनच कटाक्षानें भारतीय शिक्याचें व संदर्भाचें दर्शन घडतें. या काळांत वास्तवाचीं इतर अंगें प्रभावीपणें काव्यांतून दिसलींच नाहींत. विराट वास्तवाचा एक पक्षी भारतांत ( खरें म्हणजे महा-







राष्ट्रांत– ) फक्त एकच पीस टाकून जणूं पुढें चालता झाला.

अनिलांच्या 'भग्नमूर्ती'त नव्या भारतीयेतर वास्तवाची प्रथम दखल घेण्यांत आली. परंतु यांतहि विकृत वास्तवाची आलोचना नव्हती. 'भग्नमूर्ती'ची बैठक भारतीय विश्वकुटुंबवादाच्या आधारेंच सिद्ध झाली. आणि कळत नकळत या नव्या वास्तवग्रहणांत भारतीयत्वहि पुरेसें आलें नाही व विराट वास्तवाला आत्मसात् करण्याची बौद्धिक कुवतहि दिसून आली नाही. भारतीयांच्या पारंपरिक उदारमतवादालाच फक्त 'मानवता' हा प्रतिशब्द येथपासून मिळाला.

भारतनिरपेक्ष दृष्टीने वास्तवाची चिकित्सा प्रथम मर्ढेकरांनी केली. केशवसुतकालीन परिस्थितीप्रमाणें मर्ढेकरांच्या वेळींहि हीं ऐतिहासिक गरज होती. भारताचीं दुःखें हीं मानवतेचीं दुःखें झालीं. भारतीयांचीं शल्यें साऱ्या जगाचीं शल्यें ठरलीं. याचबरोबर प्रगतिशील पाश्चात्य संस्कृतीचे वेध भारतीयाला लागूं लागले. अणूंच्या प्रस्फोटांनी भारतहि दणाणला. मर्ढेकरांनी याच प्रकारची आलोचना आपल्या काव्यांत मांडली. मुंबईच्या जिण्यांत त्यांना युरोपचा साक्षात्कार झाला व युरोपच्या दर्शनांत त्यांना भारताच्या व्यथा दिसल्या. इथेंच मराठी कवितेची वास्तवचिकित्सा भारताच्या कक्षेबाहेर पडली व तिला वैश्विक अधिष्ठान लाभलें.

मुक्तिबोध व करंदीकर यांच्या विचारप्रधान कवितेंत कटाक्षानें भारतीय विशिष्टता टाळलेली दिसेल. ही विशिष्टता टाळल्यानें वास्तवाचें आकलन व प्रतिपादन एकाच पातळीवर होणें शक्यच नव्हतें. या विराट वास्तवाला लाखों पंख आहेत व प्रत्येक पंख तितकाच वेधक आहे. या वास्तवपक्ष्याचें दर्शनहि कुणाला त्याचें आकाशव्यापी उड्डाण होत असतांना घडतें, दुसऱ्याला तो विश्रब्धपणें उंच वृक्षराजीवर बसलेला दिसतो, कुणाला तो पंख फडफडवितांना आढळतो तर कांहींना तो कसल्याशा तीव्र वेदनेनें विव्हळतांना दिसतो.

वास्तवाच्या या मूलभूत बहुजिनसीपणाला अनेक कारणें आहेत. हीं कारणें येथें अप्रस्तुत आहेत. परंतु वास्तवाचा अनेकपदरी गोफ ही वस्तुस्थिति आहे. म्हणूनच केशवसुतांप्रमाणे विंदा करंदीकरांना ठळक विचारवाद मांडता येत नाहीं. स्वातंत्र्य, समता, बंधुता अशांसारख्या तत्त्वांचा निर्वेधपणें उद्घोष करतां येत नाहीं. "ती जनता अमर आहे," असें एकदां छातीठोकपणें सांगूनहि पुन्हां ते "दातापासून दाताकडे" प्रगत ( कीं परागत ? ) होणाऱ्या संस्कृतीचें व्यथागीत गातातच. 'जडाच्या जांभया' देतां देतांच ते 'बंडखोर आत्म्यांची' कहाणीहि ऐकवतात. एकीकडे 'यंत्रावताराचें' स्वागत करीत असतांनाच ते लगेच दुसरीकडे आपल्या मनाला दगड बनण्याचा संतापसंकुल उपदेश करतात. 'विज्ञानब्रह्माच्या हृदयांतील ओंकाराला' ओंकार देतांनाच ब्रह्मांडाच्या कुजक्या अंड्याचाहि उल्लेख करतात.

वैश्विक वास्तवाचें आकलन करण्याचें स्फुरण हें जसें स्वाभाविक आहे, तसें त्या वास्तवाचें निदान करणें सोपें नाहीं. ऐतिहासिक दृष्टीनेंहि ही अशक्यताच आहे. याचा अर्थ असा कीं आपल्या कालखंडाला वैचारिक कोंदण बसविणें करंदीकरांना आज शक्य नाहीं. ही कालनिष्ठ अक्षमता आहे. या अक्षमतेचेंच विदारक बौद्धिक आकलन करंदीकरांच्या कवितांत दिसून येतें. म्हणूनच त्या कवितेंत परस्पर विसंगत असें विचारधागे आढळतात. आजच्या आंदोलनात्मक वास्तवाचें सगळें स्पंदन अंतर्भेदी दृष्टीनें विंदा करंदीकरांनी टिपून घेतलें आहे. हें आंदोलनच कवितारूप झालें आहे. कुठल्याहि विशिष्टतेनें त्यांनीं या आंदोलनाची भरती-








ओहोटी अडवून ठेवलेली नाहीं. वास्तवाचा सगळा तपशील त्याच्या अंतर्बाह्य कलहासह त्यांच्या कवितेंत अवतरला आहे. असें करतांना कोणतेंहि भडक अकलात्म अलंकरण त्यांनी टाळलेलें आहे. म्हणूनच विंदा करंदीकरांच्या वास्तववादी कवितेने फार मोठया आशा निर्माण केल्या आहेत.

आधुनिक मराठी कवितेंत विकसनशील वास्तवाचें घडलेलें दर्शन मी वर मांडलें आहे. मुख्यत: वास्तवाची मीमांसा कशा प्रकारें केली गेली हेंच माझ्यापुढें लक्ष्य होतें. 'कविता' या ललित साहित्य-प्रकाराची बौद्धिक कक्षा माझ्या पूर्णपणें लक्षांत आहे. पण तरीहि वास्तवाचा जो विचार आधुनिक मराठी कवितेंत मला दिसला. तो गोळा करण्याचा हा प्रयत्न आहे. कवि समाजशास्त्रज्ञ नसतात व तत्त्वज्ञानीहि नसतात हें खरेंच आहे. पण काव्यांत कळत न कळत वास्तवासंबंधींचीं बौद्धिक विधानें व्यक्त होतात. कधीं प्रकटपणें तर कधीं प्रच्छन्नपणें अशीं विधानें केलीं जातात. तीं विधानें शोधण्याचा हा प्रयत्न आहे, एवढें स्पष्टीकरण देऊन हें विवेचन संपवितों.

प्रा. नी. र. वऱ्हाडपाण्डे

# अनन्ताचा अन्त

बुद्धिवादाला विरोध करणाऱ्या विचारप्रणालींमध्यें फ्रेन्च तत्त्वज्ञ हेन्री बर्गसॉ याच्या तत्त्वज्ञानाचा प्रामुख्यानें अन्तर्भाव करावा लागेल. बुद्धि ही सत्याचें ज्ञान करून देण्यासाठीं निर्माण झालेली नसून जीवनसंघर्षांत उपयोगी पडणारें एक शस्त्र म्हणून निर्माण झाली आहे, अर्थात् बुद्धि ही ज्ञानेंद्रियासारखी नसून कर्मेन्द्रियासारखी आहे हा त्याचा सिद्धान्त प्रसिद्ध आहे. या सिद्धान्ताप्रमाणें बुद्धीचा वापर कोणत्याहि वस्तूचें अन्तिम स्वरूप समजावून घेण्यासाठीं करणें हमखास निष्फळ ठरणारें आहे. ज्ञान हें बुद्धीचें उद्दिष्टच नव्हे. खरें ज्ञान केवळ आन्तरिक अनुभूतीनेंच होऊं शकतें.

बुद्धीनें खरें ज्ञान होऊं शकत नाहीं या तत्त्वाचें समर्थन करण्यासाठीं बर्ग सॉ बुद्धीला सोडवतां न आलेल्या—अर्थात् त्याच्या मतें-कांहीं विसङ्गतींकडे बोट दाखवतो. या विसङ्गति आजपर्यंत बुद्धीला उलगडल्या नाहींत व पुढेंहि उलगडणार नाहींत असा त्याचा दावा आहे.

या विसङ्गतींचें उत्कृष्ट उदाहरण प्राचीन ग्रीक तत्त्वज्ञ झीनो यानें गतीचें अस्तित्व असिद्ध करण्यासाठीं जे युक्तिवाद माण्डले त्यांत सांपडतें. झीनोच्या सर्वच युक्तिवादांशीं आपल्याला कर्तव्य नाहीं. वानगीदाखल त्याच्या फक्त एकाच युक्तिवादाचा विचार करूं. हा युक्तिवाद असा--

( १ ) एखादा बाण धनुष्यापासून लक्ष्यापर्यन्त कधींच पोंचूं शकणार नाहीं. कारण हें पूर्ण अन्तर जायच्या आधी त्याला त्याच्या अर्धें अन्तर जावें लागेल, हें अर्धें अन्तर जायच्या आधी त्याच्या अर्धें म्हणजे मूळ अन्तराच्या चतुर्थांश अन्तर जावें लागेल, हें चतुर्थांश अन्तर जायच्या आधी त्याच्या अर्धें म्हणजे मूळ अन्तराच्या अष्टमांश अन्तर जावें लागेल...... $\frac{१}{२}$, $\frac{१}{४}$, $\frac{१}{८}$...... इत्यादि अन्तरें तोडण्याचा हा क्रम कधीच संपू शकणार नाहीं. कारण हा क्रम संपायला शेवटचें अंतर शून्य असलें पाहिजे. पण अन्तर कितीहि लहान असलें तरी त्याचें अर्धें अन्तर शून्य असूं शकत नाहीं. अर्थात् अर्धीं अर्धीं अन्तरें तोडण्याचा हा क्रम अनन्त आहे व तो कधींच संपूं शकणार नाहीं.

झीनोचा हा युक्तिवाद शब्दच्छलाच्या स्वरूपाचा आहे असें कांहीं लोक समजतात. पण हें मत आजकाल तत्त्वज्ञांना मान्य नाहीं. झीनोचा युक्तिवाद गणित, तर्कशास्त्र व तत्त्वज्ञान यांतील एक सर्वंकष समस्या उपस्थित करतो, याबद्दल बहुतेक तज्ज्ञांचें एकमत आहे. ही समस्या म्हणजेच अनन्ताची समस्या.

## मेरु आणि मोहरी

ही समस्या केवळ गतीच्याच बाबतींत उपस्थित होते असें नाहीं. बिन्दूला लांबी, रुंदी, उंची वगैरे कांहींच परिमाण नसतें, पण अस्तित्व मात्र असतें असें जेव्हां शाळेंत मास्तर शिकवतात तेव्हां हें काय गौडबंगाल आहे याबद्दल त्यांनाहि विशेष बोध झालेला नसतो व विद्यार्थ्यांना "बाबावाक्यं प्रमाणम्" या पलीकडे कांहीं गति नसते. शाळकरी मुलांना देखील अडणारी ही समस्या म्हणजे अनन्ताचीच समस्या आहे. एका पेढ्याचा अर्धा भाग होऊं शकतो, त्या अर्ध्या भागाचा पुनः अर्धा भाग होऊं शकतो, याप्रमाणें एका पेढ्याचे अनन्त भाग होऊं शकतात, म्हणजे या भागांमध्यें शेवटचा भाग, कीं ज्याचा भाग शून्य असेल– असा कोणता भागच नसतो. पण बिन्दु म्हणजे ज्याचा भागच होऊं शकत नाहीं तो. हा बिन्दु आला कुठून ?

परमाणुवादावर विचार करणाऱ्या भारतीय तत्त्वज्ञांच्या लक्षांत ही अडचण आली होती. प्रत्येक पदार्थ अविभाज्य परमाणूंचा बनलेला आहे म्हणावें तर परमाणूला भागच नसतात असें म्हणावें लागेल. मग ज्यांना भागच नाहींत असे दोन परमाणुं एकमेकांना चिकटणार कसे ? एक चेण्डू दुसऱ्या चेण्डूला चिकटूं शकतो.










कारण एकाचा उजवा भाग दुसऱ्याच्या डाव्या भागाला लागूं शकतो. पण परमाणूंना भागच नसल्यामुळें एक परमाणु दुसऱ्या परमाणूला चिकटला यांचा अर्थ, एक सबन्ध परमाणु दुसऱ्या सबन्ध परमाणूला लागला असा करावा लागेल. परमाणुसंयोगाचा हाच अर्थ असेल तर एका परमाणूपेक्षां दोन परमाणु मिळून अधिक मोठा आकार होऊं शकणार नाहीं, कारण परमाणूंचा संयोग म्हणजे एकमेकांत पूर्ण विलीनीकरण !*

यावर तोड म्हणून असें सुचविण्यांत येतें कीं परिमाणशून्य बिंदु किंवा परमाणु असा खरोखरच अस्तित्वांत नसतो. रेषा बिन्दूंची बनलेली असते किंवा पदार्थ परमाणूंचा बनलेला असतो असें म्हणण्याचा अर्थ एवढाच कीं कोणत्याहि रेषेचे वा पदार्थाचे अनन्त भाग करत येतात. केलेला कोणताहि भाग अविभाज्य नसतो.

ही तोड देखील आपल्या प्राचीन नैयायिकांना सुचली होती. पण तिच्यांत देखील एक अडचण आहे हें त्यांना दिसून आलें. ही अडचण अशी कीं प्रत्येक पदार्थाचे अनन्त भाग होतात असें मानल्यानें मोहरी व हिमालय यांच्यांत कांहींच फरक नाहीं असें मानावें लागेल. कारण मोहरीचेहि अनन्त भाग होतात व हिमालयाचेहि अनन्त भाग होतात. मेरुसर्षपयोस्तुल्यपरिमाणत्वप्रसङ्गः ! एक इंच व एक फूट यांत कांहींच फरक नाहीं असें मानावें लागेल, कारण एका इंचाचेहि अनन्त भाग होतात व एका फुटाचेहि अनन्त भाग होतात!

बरें परमाणु अविभाज्य असतात म्हणजे त्यांना भागच नसतात असें नसून त्यांचे भाग करतां येत नाहींत, म्हणजे ते फोडतां येत नाहींत असें मानलें तरी निभाव लागत नाहीं. परमाणु फोडतां न आले तरी अर्धा परमाणु पूर्ण परमाणुपेक्षां लहान असतो व एकचतुर्थांश परमाणु अर्ध्या परमाणुपेक्षांहि लहान असतो हें कबूल करावेंच लागतें. परमाणूचे भाग करतां आले नाहींत तरी परमाणूला भाग **असतात**. तेव्हां पर्वत आणि परमाणु यां दोहोंचेहि भाग अनन्त असतात या अडचणींतून सुटका होत नाहीं.

## रावणाचीं अनन्त शिरें

(२) अनन्ताच्या अडचणी एवढ्यानें सम्पत नाहींत. अनन्ताची कल्पना किती घोटाळयाची आहे हें दाखवून देण्यासाठीं रामरावणयुद्धाचें उदाहरण घेतां येईल. रामानें आपल्या बाणानें रावणाचें शिर उडवलें कीं पुनः तेथें नवीन शिर निर्माण होई. रामानें शिर उडवावें व पुनः नवें शिर उत्पन्न व्हावें असें करतां करतां अनन्त शिरें कापलीं गेलीं व अनन्त नवीन शिरें फुटलीं. मग शेवटीं रावणाच्या धडावर शिर उरलें कीं नाहीं ? उरलें म्हणावें तर रामानें प्रत्येक शिर कापलें या म्हणण्याला बाध येतो. उरलें नाहीं म्हणावें तर प्रत्येक वेळीं नवीन शिर फुटलें या म्हणण्याला बाध येतो. शिरें फुटण्याची व कापण्याची क्रिया अनन्त वेळां घडली असें म्हटल्यानें असा वदतोव्याघात निर्माण होतो.

(३) अनन्तानें उत्पन्न केलेल्या वदतोव्याघाताचें यापेक्षांहि अधिक परिचयाचें उदाहरण म्हणजे जगन्निर्मितीचा प्रश्न. भूतकालामध्यें आजपर्यंत किती वर्षें लोटून गेलीं असा प्रश्न कुणी विचारला तर साहजिकच "अनन्त वर्षें" असें उत्तर तोण्डातून निघतें. पण हें उत्तर फारच अडचणीचें आहे. अनन्त म्हणजे जें कधीं सम्पूंच शकत नाहीं तें. अर्थात् अनन्त वर्षांचा काल कधीं सम्पूच शकणार नाहीं. पण आजपर्यन्तचा काल सम्पलेला आहे तेव्हां तो अनन्त असूं शकणार नाहीं.

बरें तो सान्त आहे असें म्हणावें तर आजपर्यन्त कांहीं मोजतां येण्यासारखीं वर्षेंच लोटलीं असलीं पाहिजेत. समजा, आजपर्यंत लोटलेल्या सर्व वर्षांची संख्या क्ष आहे. असें असेल तर क्ष वर्षांपूर्वी कालाला प्रारम्भ झाला असेल. म्हणजे क्ष वर्षापूर्वी कालच नव्हता असें म्हणावें लागेल. पण असें म्हणणेंहि सोपें नाहीं. कारण "क्ष वर्षापूर्वी" हें एका विशिष्ट कालाचेंच लक्षण आहे. क्ष वर्षापूर्वी काल नव्हता असें म्हणणें मरणापूर्वी जीवन नव्हतें असें म्हणण्यासारखेंच व्याघातमय आहे.

सारांश काल अनन्त आहे म्हणावें तरी पंचाईत, सान्त आहे म्हणावें तरी पंचाईत !

---

* ब्रह्मसूत्र शाङ्करभाष्य अ. २, पाद २.







अनन्ताची कल्पना करतांना अशा अनेक समस्या दत्त म्हणून पुढे उभ्या राहतात. अशा समस्या सोडवण्याची बर्गसाँ सारख्या तत्त्वज्ञांची रीत म्हणजे त्या बुद्धीनें सुटूंच शकत नाहींत, किम्बहुना बुद्धीच या नसत्या समस्या निर्माण करते, तेव्हां बुद्धीची कास सोडून अन्तर्दर्शनाला आपण शरण गेलें पाहिजे ही होय. थोडीबहुत अशीच भूमिका अनिर्वाच्यवाद्यांची आहेः– सृष्टि ही बुद्धीला आकलन होण्यासारखी नाहीं, तिचें व्याघातरहित वर्णनच होऊं शकत नाहीं. ती अनिर्वचनीय आहे. सत्याचें ज्ञान फक्त अपरोक्षानुभूतीतच होऊं शकतें.

## यतो वाचो निवर्तन्ते

सृष्टि अनिर्वाच्य आहे म्हणजेच ती आभासरूप आहे असाहि कधीकधी अर्थ करण्यांत येतो. कोणत्याहि पदार्थाची व्याख्या करूं गेलें तर ती विसङ्गत ठरते असें श्री हर्षानें आपल्या 'खण्डन खण्ड खाद्य' या ग्रंथांत दाखवून देण्याचा प्रयत्न केला आहे. त्याच्या मतें या प्रयत्नानें मायावाद सिद्ध होतो, कारण जें विसङ्गत व अनिर्वाच्य आहे त्यालाच माया म्हणतात.

बर्गसाँ व अनिर्वाच्यवादी या दोघांचेहि तार्किक समस्या सोडवण्याचे हे मार्ग पलायनवादी स्वरूपाचे आहेत. एकतर बुद्धीला आजपर्यन्त एखादा प्रश्न सोडवतां आला नाहीं यावरून तो पुढें कधींच सोडवतां येणार नाहीं असें सिद्ध होत नाहीं. जो प्रश्न सोडवता आला नाहीं तो सोडवण्याचा चंग बांधणें हेंच तत्त्वज्ञांचें कर्तव्य आहे. तो सोडवतां येणारच नाहीं असें मानण्यांतच एक प्रकारचें समाधान मानणें निकोप वृत्तीचें लक्षण म्हणतां येणार नाहीं.

शिवाय सृष्टीचें अमुक गूढ उकलत नाहीं म्हणून सृष्टि अनिर्वाच्य आहे असें म्हटल्यानें काय साधतें ? सृष्टि हा आभास असेल, भ्रम असेल, पण भ्रम तरी विसङ्गत का असावा ? सत्य जसें विसङ्गत असूं शकत नाहीं तसाच भ्रमहि विसङ्गत असूं शकत नाहीं. वन्ध्यापुत्र, चौकोनी वर्तुळ, अंधाराचा प्रकाश या विसङ्गत वस्तु सत्यसृष्टींतच काय, स्वप्नांत देखील दिसूं शकत नाहींत. स्वप्नांत हजार डोक्याचा राक्षस दिसेल, शशशृङ्ग दिसेल, वाळूंतून तेल निघतांना दिसेल, पण वन्ध्यापुत्र दिसूं शकणार नाहीं. कारण शशशृङ्ग, वालुकातैल वगैरे वस्तु अस्तित्वांत नसल्या तरी त्या विसङ्गत नाहींत. शश म्हणजे ज्याच्या डोक्यावर शिंग नाहीं तो असा शश या शब्दाचा अर्थ नाहीं. तैलशून्य पदार्थ असा वाळू या शब्दाचा अर्थ नाहीं. पण जिला पुत्र होऊं शकत नाहीं ती असाच मुळीं वंध्या या शब्दाचा अर्थ आहे. तेव्हां वंध्यापुत्र स्वप्नांत देखील दिसणें अशक्य आहे, हें स्पष्ट आहे. मग " आभास ", " माया " वगैरे उद्घोष केल्यानें सृष्टींतील विसङ्गतींचा निरास कसा होणार ?

हा निरास करण्याचा एकच मार्ग आहे व तो म्हणजे आपलें तर्कशास्त्र अधिक प्रखर, अधिक सूक्ष्म, व अधिक मूलगामी करणें.

## अनंताला गवसणी

अनन्ताच्या अनंत समस्यांच्या बाबतींत कँटर, वेस्ट्रास वगैरे गणिती व रसेलसारखे गणिती तत्त्वज्ञ यांनीं हाच मार्ग अनुसरला आहे. तार्किक विसंगतींना भिऊन त्यांनीं गूढगुंजनाची गुंगी किंवा अनिर्वाच्यवादाची शरणागति न पत्करतां या विसंगतींना सरळ दंड थोपटून आव्हान दिलें व शेंकडों वर्षांच्या परिश्रमानंतर त्यांच्यावर विजय मिळविला. या विजयाचा इतिहास उद्बोधक असला तरी गणित व तर्कशास्त्र यांत विशेष गोडी नसणाऱ्या वाचकांना तो किचकट वाटण्याचा संभव आहे. म्हणून विशेष खोलांत न शिरतां त्याचें नुसतें दिग्दर्शन करण्याचें योजलें आहे.

प्रत्येक पदार्थाचे अनन्त भाग होतात असें मानल्यानें मेरु व मोहरी सारखीच ठरतील अशी आपल्या नैयायिकांना भीति वाटत होती. नैयायिकांचे बौद्धिक वारसदार जे आधुनिक तर्कशास्त्रज्ञ, त्यांनीं या भीतीचा निरास केला आहे, इतकेंच नव्हे तर ही भीति व्यक्त करतांना अनन्ताच्या बाबतींतलें एक महान् सत्य नैयायिकांना प्रतीत झालें होतें असें दाखवून दिलें आहे.

हें स्पष्ट करण्यासाठीं आपण फूट व इंच यांचें उदाहरण घेऊं. फुटाचे व इंचाचे खालीलप्रमाणें भाग होऊं शकतात :

१/२,' १/४,' १/८' ........
१/२," १/४," १/८" ........

म्हणजे फुटाच्या प्रत्येक भागाला जोड म्हणून इंचाचा एक भाग आहेच आणि या भागांची संख्या








अनंत आहे. पण दोन्ही भागांची संख्या याप्रमाणें सारखीच असली तरी फुटाचा प्रत्येक भाग इंचाच्या तत्सदृश भागाच्या बारापट मोठा आहे. तेव्हां फूट व इंच बरोबर ठरण्याची भीति नाहीं. आगगाडीला दहा डबे असले व बाळयाच्या खेळण्यांतल्या गाडीलाहि दहाच डबे असले, तरी खेळण्याची गाडी व आगगाडी सारखीच ठरत नाही. हिंदुस्थानच्या नकाशांत जेवढीं शहरें असतात तेवढींच हिंदुस्थानांतहि आहेत म्हणून हिंदुस्थान व त्याचा नकाशा सारख्याच आकाराचे ठरत नाहींत.

भागांची संख्या सारखी असली म्हणजे पदार्थ सारखेच ठरत नाहींत हें तत्त्व सान्त संख्यांच्या बाबतींत किती उघड आहे हें या उदाहरणावरून दिसतें. मग भागांची संख्या अनन्त असली तर तें लागूं शकणार नाहीं असें नैयायिकांना कां वाटलें ?

याचें उत्तर स्पष्ट आहे. पदार्थांचे अनन्त भाग केल्यानें शेवटचा लहानांतला लहान भाग भूमितीच्या बिन्दूसारखा राहील व एक बिन्दु दुसऱ्या बिन्दुपेक्षां मोठा आहे असें म्हणणें बरोबर नाहीं म्हणून मेरु व मोहरी या दोहोंचेहि अनंत भाग होत असले तरी मेरूचे भाग मोहरीच्या भागापेक्षां मोठे असतात म्हणून मेरु व मोहरी सारखीं ठरत नाहींत अशी सुटका करण्याची सोय राहात नाहीं. पदार्थांचे अनन्त भाग केले म्हणजे प्रत्येक भाग बिन्दूसारखा परिमाणशून्यच असला पाहिजे ही कल्पना या अडचणीच्या मुळाशीं आहे.

पण ही कल्पना खरी नाहीं. कोणत्याहि पदार्थाचे $\frac{1}{2}$, $\frac{1}{4}$ ... याप्रमाणें अनंत भाग होऊं शकतात, पण यापैकीं कोणताहि भाग बिंदुसारखा परिमाणशून्य नाहीं.

## " पूर्णस्य पूर्णमादाय ... "

मेरु व मोहरी या दोघांचेहि अनंत भाग होतात ही कल्पना आधुनिक गणितज्ञांनीं केलेल्या अनंताच्या विवेचनांतील मूलभूत कल्पना आहे. ज्या समूहामध्यें अनंत घटक असतात, त्या समूहाचे कांहीं भागहि असे असतात कीं ज्याचे अनंत घटक असतात. किंबहुना ही अनंत या संख्येची व्याख्याच आहे असें म्हणायला हरकत नाहीं. अनंत घटक असलेल्या समूहाचें सर्वांत निर्विवाद उदाहरण म्हणजे संख्यांचें. १, २, ३ ... असे सर्व पूर्णाङ्क घेतले तर त्यांची संख्या किती भरेल असें विचारल्यास " अनंत " असें उत्तर द्यावें लागतें. समजा, खालीलप्रमाणें हे अनंत पूर्णाङ्क एका ओळीनें माण्डले आहेत व या प्रत्येक अङ्काच्या खाली त्याच्या दुप्पटीनें मोठा असा अंक लिहिला आहे :

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ............ | I |
| २ | ४ | ६ | ............ | II |

या व्यवस्थेमध्यें वरच्या ओळींत जितके अङ्क आहेत तितकेच खालच्याहि ओळींत आहेत असें मानलें पाहिजे. कारण कोणत्याहि अङ्काला दोननें गुणतां येतें. शिवाय कोणताहि अङ्क त्याच ओळींत दोनदां आलेला नाहीं.

पण उलट पक्षीं वरच्या ओळींत सर्व पूर्णाङ्क आहेत मग ते सम असोत कीं विषम, आणि खालच्या ओळींत फक्त सम अङ्क आहेत कारण ते सर्व दोननें गुणून मिळवलेले आहेत.

या दोन मुद्यांवरून असें सिद्ध होतें कीं सम व विषम मिळून जितके अङ्क आहेत तितकेच नुसते सम अङ्कहि आहेत. नुसत्या सम अङ्कांची संख्या, सम व विषम दोन्ही प्रकारचे अङ्क जमेस धरून होणाऱ्या संख्येइतकीच आहे. अनंत समूहामध्यें जितके घटक असतात तितकेच त्याच्या एखाद्या उपसमूहामध्यें देखील असतात असें या उदाहरणावरून म्हणावें लागतें.

अनंतांतून अनंत काढून घेतल्यानें अनंतच उरतें किंवा त्यांत अनंत मिळविल्यानें बेरीज देखील अनंतच होते यावरून " पूर्णस्य पूर्णमादाय- पूर्णमेवावशिष्यते " या उपनिषद् वाक्याची वाचकांना येथें आठवण होईल. अनंत समूहामध्यें जेवढे घटक असतात तेवढेच त्याच्या उपसमूहामध्यें असल्यामुळें एखादा उपसमूह काढला किंवा जोडला तरी मूळ समूहाची संख्या कमीजास्त कशी होणार ?

## साधें तर्कशास्त्र

कांहीं लोकांना हें फार अतर्क्य भासतें. वजाबाकीनें न घटणारी व बेरजेनें न वाढणारी अशी संख्या कल्पिणारे गणिती बुद्धिवादी नसून गूढगुंजनी आहेत अशी शंका येते.










पण यांत गूढगुंजन कांहींहि नसून केवळ "तर्क-कर्कश विचारचातुरी" आहे. वजाबाकीनें संख्या घटलीच पाहिजे व बेरजेनें वाढलीच पाहिजे असा आग्रह काय म्हणून ? इतर संख्या गुणाकारानें बदलल्या तरी शून्य गुणाकाराला मुळींच बधत नाहीं. कितीनेंहि गुणा शून्य तें शून्यच. गुणाकाराप्रमाणेंच भागाकारालाहि तें दाद देत नाहीं. कितीनेंहि भागा, भागाकार शून्यच. गुणाकारानें न वाढणारी व भागाकारानें न घटणारी संख्या कल्पिण्यांत जर गूढगुंजन नाहीं तर बेरजेनें न वाढणारी व वजाबाकीनें न घटणारी संख्या कल्पिण्यांत गूढगुंजन कां प्रादुर्भूत व्हावें ?

अनंताच्या तोंडावळ्याची एवढी ओळख पटवून दिल्यावर सुरवातीला उपस्थित केलेल्या अनंतविषयक समस्या गणितज्ञांनी कशा सोडवल्या आहेत याचें थोडें दिग्दर्शन करतों.

( १ ) कोणत्याहि अंतराचे $\frac{१}{२}$, $\frac{१}{४}$ वगैरे भाग आपण एक, दोन या क्रमानें मोजत बसलों तर तें अंतर कधींच संपणार नाहीं हें खरें आहे. पण एखादा बाण धनुष्यापासून लक्ष्यापर्यंत जाण्याची क्रिया या मोजण्याच्या क्रियेसारखी नसते. मोजण्याच्या क्रियेंत पहिल्या अंकानंतर लगेच दुसरा अंक येतो. पण आतां सुटलेला बाण १ मिनिटानें लक्ष्यावर लागतो तेव्हां सुटल्याबरोबर म्हणजे पहिल्या क्षणानंतर लगेच तो कुठे होता असें विचारतां येत नाहीं. कारण सुटल्याबरोबर लगेच म्हणजे केव्हां ? बाण जर दहा वाजतां सुटला असेल तर सुटल्याबरोबर लगेच म्हणजे दहा वाजून एका सेकंदानें, कीं दहा वाजून अर्ध्या सेकंदानें, कीं दहा वाजून एक चतुर्थांश सेकंदानें ? या प्रश्नाला उत्तर देतांच येणार नाहीं कारण दहा वाजण्याच्या लगेच नंतर कोणताहि क्षण नसतो. दहा वाजल्यानंतरचा कितीहि जवळचा क्षण घेतला तरी त्या क्षणाच्या पूर्वी व दहा वाजल्यानंतर असे अनेक क्षण असतात. अर्थात् मोजण्याची क्रिया व बाणाची गति या अगदी वेगळ्या प्रकारच्या क्रिया आहेत. तेव्हां मोजण्याच्या प्रक्रियेनें बाणाच्या गतीची उपपत्ति लागूं शकणार नाहीं. मोजण्याच्या क्रियेनें $\frac{१}{२}$, $\frac{१}{४}$ वगैरे अंतरें संपवतां न आलीं तरी बाणाच्या गतीला तीं संपवतां येणार नाहींत असें त्यावरून ठरत नाहीं.

( २ ) रामानें रावणाचीं शिरें अनंतवेळां कापलीं तर शेवटीं रावणाच्या डोक्यावर शिर उरलें कीं नाहीं या प्रश्नाचें उत्तरहि आतां स्पष्ट होईल. रावणाचीं अनंत शिरें एक, दोन, या क्रमानें कापलीं गेलीं असतील तर या क्रमाला शेवटच नसल्यामुळें शेवटी रावणाच्या डोक्यावर शिर उरलें कीं नाहीं हा प्रश्न अप्रस्तुत आहे. १, २, ३, ४... या संख्यांतली शेवटची संख्या सम आहे कीं विषम आहे या प्रश्नासारखा हा प्रश्न आहे. वरील क्रमामध्यें शेवटची संख्याच नाहीं तेव्हां ती सम आहे कीं विषम आहे असें विचारणें आत्याबाईच्या मिशा अजून काळ्या आहेत कीं पांढऱ्या झाल्या असें विचारण्यासारखें आहे.

## जगन्निर्मितीपूर्वी

( ३ ) जगन्निर्मितीच्या प्रश्नाचें उत्तर समजायला थोडें कठिण आहे. आजपर्यंत किती वर्षें लोटलीं या प्रश्नाचें उत्तर अनेक प्रकारांनीं देतां येण्यासारखें आहे. आजपर्यंत म्हणजे केव्हांपासून आजपर्यंत असा प्रश्न उपस्थित होतो. काल निर्माण झाला तेव्हांपासून आजपर्यंत असें म्हटलें तर हीं वर्षें एखाद्या सान्त संख्येनें व्यक्तवितां येतील. काल निर्माण झाला तें पहिलें वर्ष व त्यापूर्वीं वर्षेंच नव्हतीं असें म्हणण्यांत वदतोव्याघात नाहीं. त्यापूर्वीं हे शब्द कालवाचक असले तरी त्यांनीं द्योतित केलेला काल अस्तित्वांत असलाच पाहिजे असें नाहीं. "शून्यापेक्षां लहान धन संख्या" हे शब्द संख्यावाचक असले तरी त्यांनीं द्योतित केलेली संख्या अस्तित्वांत नाहीं. "शशशृङ्ग" हा शब्द शृङ्गवाचक असला तरी शशशृङ्ग अस्तित्वांत नाहीं.

बरें कालाची निर्मिति झालीच नाहीं, काल अनादि आहे असें मानलें तर आजपर्यंत अनंत वर्षें लोटली असें म्हणावें लागतें. अनादि कालाची आजपर्यंत किती वर्षें लोटलीं हा प्रश्न शून्याच्या पूर्वी किती ऋण पूर्णाङ्क आहेत या प्रश्नासारखा आहे. शून्य व त्याच्यापूर्वीचे ऋण पूर्णाङ्क खालीलप्रमाणें लिहितां येतील.

... –६, –५, –४, –३, –२, –१, ०

या क्रमामध्यें शेवटीं शून्य आहे पण त्याची सुरुवात कुठेंच होत नाहीं. तो अनादि आहे. अर्थात् शून्यापूर्वींच्या ऋण संख्या अनंत आहेत असें म्हणावें








लागतें. त्याचप्रमाणें यंदाच्या वर्षापूर्वीं अनन्त वर्षें लोटलीं हाच सिद्धान्त ठरतो.

तात्पर्य जग अनादि आहे कीं नाहीं, तें निर्माण झालें कीं नाहीं हा प्रश्न केवळ गणितानें सुटणें शक्य नाहीं. जग अमुक वर्षांपूर्वीं निर्माण झालें असेल किंवा तें केव्हांच निर्माण न होतां आजपर्यंत अनंत वर्षें लोटलीं असतील हे दोन्ही पर्याय गणिताच्या दृष्टीनें समर्थनीय आहेत. *

अनंत ही कल्पना बुद्धिगोचर आहे व आधुनिक गणितज्ञांनीं अनंताचेंहि गणित बसवलें आहे हा बुद्धिवादाचा मोठाच विजय आहे. प्रस्तुत लेख वाचून या विषयाचा अभ्यास अधिक करण्याची कांहीं वाचकांना बुद्धि व्हावी एवढाच हेतु आहे. आधुनिक गणित व तर्कशास्त्र यांच्या या शाखेचें यापेक्षां अधिक सखोल विवरण येथें करणें शक्य नाहीं.

---

* आतांपर्यंत लोटलेला काल सांत असणें शक्य असलें तरी जग निर्माण झालें ही कल्पना तर्कशास्त्राच्या दृष्टीनें व्याघातमय आहे. पण याचें अधिक विवेचन स्वतन्त्रपणें करावें लागेल.










श्री. बा. रा. मावळंकर

# वयोवृद्ध महर्षि: बर्ट्रांड रसेल यांचें जीवनकार्य

आधुनिक काळांतील ज्येष्ठ आणि श्रेष्ठ विचार प्रवर्तक लेखकांत बर्ट्रांड रसेल यांची योग्यता फार मोठी असून त्यांच्या निरनिराळ्या पुस्तकांतून त्यांनी आपली स्वतंत्र विचारसरणी, नव्या कल्पना व आधुनिक आचारविचारांतील फोलपणा स्पष्टपणें दाखवून दिला आहे. त्यांच्या नव्या विचार-आचारामुळें त्या त्या वेळीं मोठी खळबळ उडाली असून त्यांना वैयक्तिक त्रास, अपमान व कष्ट सोसावे लागले आहेत, त्यांना तुरुंगवास भोगावा लागला; त्यांना व्याख्यानें देण्याला बंदी करण्यांत आली, सरकारी अगर विश्वविद्यालयांतील प्राध्यापकाच्या जागा सोडाव्या लागल्या आहेत; तर कित्येकवेळां त्यांनीं आपण होऊन उच्च जागांचा त्याग केला आहे. आजकालच्या व्यक्तिस्वातंत्र्याच्या काळांत स्वतंत्र विचारसरणीकरितां व नवमतांबद्दल, इंग्लंडसारख्या पुढारलेल्या देशांत अशा तेजस्वी व मनस्वी लोकांना तुरुंगवास घडला असेल ही कल्पना आपल्याला धक्का देणारी वाटते. रशियासारख्या पोलादी तटामागील राष्ट्रांत साम्यवादाविरुद्ध मतप्रदर्शन करणें हा मोठा गुन्हा मानला जातो व असें मत पुरस्करणाऱ्याला तो कितीहि मोठा विद्वान अगर शास्त्रज्ञ असला तरी सैबेरियाच्या लोखंड-दगडी कोळशाच्या खाणींत कामें करावयाला लावितात अगर लष्करी गोळीबाराला तोंड द्यावें लागतें.

बर्ट्रांड रसेल हे मोठे तत्त्वज्ञानी असून कांट, हेगेल अगर स्पिनोझा यांच्या तत्वज्ञानी विचारसरणीचा परिणाम त्यांच्या लिखाणावर झालेला दिसून येतो. त्यांनीं जगाचा प्रवास केला असून जर्मनी, रशिया, चीन व आस्ट्रेलिया यामध्यें ते राहिले आहेत. त्यांना सन १९१८ मध्यें पहिल्या महायुद्धाविरुद्ध शांततावादाचा पुरस्कार केल्याबद्दल शिक्षा झाली. सन १९४० मध्यें अमेरिकेंतील न्यूयॉर्क येथील विश्वविद्यालयांतून त्यांना प्राध्यापकाच्या जागेचा राजीनामा द्यावा लागला. ग्रीक तरुणांना बिघडविणारें तत्त्वज्ञान शिकविल्याबद्दल सॉक्रेटिसाला प्राचीनकाळीं, विष प्राशन करून देहत्याग करावा लागला. आधुनिक काळांतील या विद्वान महर्षीला अपमान व दु:ख सहन करावें लागलें आहे. त्यांनीं लिहिलेलें "मॅरेज अँड मॉरल्स" लग्न आणि नीति या ग्रंथानें युरोप-अमेरिकेंत मोठीच खळबळ उडविली होती.

सेंट पॉलनें स्त्री-पुरुषांच्या कायदेशीर संबंधालासुद्धां विरोध केला आहे. त्यापासून आनंद निर्माण होता कामा नये. पूर्वीच्या चर्चेनें यामध्यें आणखी भर घालून हे निर्बंध जाचक केले आहेत. "ब्रह्मचर्य हें पवित्र होय, पण सैतानाशीं झगडण्याकरितां जंगलांतील वानप्रस्थाश्रम स्वीकारला तरी व्यक्तीच्या मनामध्यें स्वर्गीय सौख्याच्या कल्पना असतातच." टॉलस्टाय व महात्मागांधी यांनीं आपल्या उतारवयांत ब्रह्मचर्याची स्तुति केली आहे. त्यांनीं स्त्री-पुरुष संबंधाचा निषेध केला आहे. टालस्टॉयनें तंबाखूचा निषेध केला आहे. त्यानें एका कादंबरींत नायक खून करण्याकरितां जातो तेव्हां तो सिगारेट ओढतो असें वर्णिलें आहे; व त्यामुळें त्याला जोर येतो. तंबाखूचा निषेध बायबलांत केलेला नाहीं, तथापि सॅम्युएल बुटलर म्हणतात त्यावरून सेंट पॉलला तंबाखू त्यावेळीं माहिती असता तर त्यानें त्याचाहि निषेध केला असता!"



अनुक्रमणिका






ते म्हणतात : सेंट थॉमसच्या मताप्रमाणें परमेश्वरी कायदा म्हणतो, शेजाऱ्यावर थोडें कमी प्रेम करा, देवावर अधिक प्रेम करा. लग्नापूर्वी स्त्री-पुरुष संबंध नसावेत; संतति-नियमन असूं नये कारण तें निसर्गाच्या विरुद्ध आहे. ब्रह्मचर्य आयुष्यभर पाळावें; मुलांच्या शिक्षणाकरितां व उदरनिर्वाहाकरितां पित्याची आवश्यकता अधिक, म्हणून लग्नविच्छेद नसावा. एकपत्नीव्रत पाळावें. बहुपत्नीकत्व स्त्रियांना अन्याय्य होय तर बहुपतित्व मुलांचें पितृत्व ठरवूं शकत नाहीं म्हणून त्याज्य.

(—हिस्टरी ऑफ वेस्टर्न फिलॉसफी पृ. ४८१)

## मानसशास्त्रीय विचार

बर्ट्रांड रसेल यांना नोबेल पारितोषिक मिळालें (सन १९५०) त्यावेळेच्या समारंभाचे वेळीं त्यांनीं केलेलें भाषण अत्यंत महत्त्वाचें आहे. त्यामध्यें त्यांनीं असें म्हटलें आहे कीं, मनुष्यस्वभाव शतकानुशतकें बदललेला नाहीं. अहंकार, सत्तास्पर्धा, आणि प्रेमभावना या मनुष्यामध्यें उत्कट क्रिया घडवून आणितात. "Vanity is a motive of immense potency" लहान मुलांचे वर्गांत "बाई, इकडे बघा, माझ्याकडे बघा!" असें आर्जवून सांगणारीं मुलें आपण कांहींतरी विशेष करीत आहोंत हें दर्शवितात; व्यक्तीच्या मनाची प्रमुख इच्छा म्हणजे अभिमान अथवा अहंकार होय. त्या अभिमानापायीं त्याच्या हातून पुष्कळ कार्य होऊं शकेल. अहंकार हा शब्द आपल्याला तितकासा योग्य वाटत नाहीं, परंतु अभिमान या शब्दानें व्हॅनिटी याचा बोध होतो. कित्येकवेळां मनुष्य वेड्याप्रमाणें वागेल, तर कित्येकवेळां मेल्यावरहि प्रसिद्धि मिळावी अशा करितांहि तो चमत्कारिकपणें वागेल. मध्ययुगांतील एका लहानशा राजपुत्राला मरणोन्मुखशय्येवर असतांना विचारण्यांत आलें कीं तुला कशाचा पश्चात्ताप होतो काय? तर तो म्हणाला, 'होय.' एकदां एके दिवशी एक मोठा राजा व धर्मगुरु पोप महाशय हे माझ्याबरोबर होते व त्यांना माझ्या राजवाड्याच्या उच्च गच्चीवरून मी सभोंवारचा देखावा दाखवीत होतों, त्यांना गच्चीवरून ढकलून देण्याची संधि मी घालविली व एक मोठा प्रसिद्धीचा मार्ग मी घालविला!"

लॉर्ड रसेल यांचा दुसरा एक अनुभव मजेचा आहे. इस्टोनिपांतीं दोन लहान मुली-दुष्काळांतून वांचलेल्या, त्यांनी बाळगिल्या होत्या "आमचे घरीं खायला प्यायला भरपूर होतें, व त्यांना सर्व कांहीं मिळत होतें, तरी त्या शेजारील दुसऱ्यांच्या बागेंत जाऊन चोरून बटाटे आणून सांठवून ठेवीत असत." प्रसिद्ध कोट्याधीश रॉकफेलर लहानपणीं अतिशय गरीब स्थितींतून पुढें आला, त्यालाहि अशीच संवय होती, व तो मोठेपणींहि तसेंच वागत असे. 'स्वभावो दुरतिक्रमः' हेंच खरें.

मनुष्यांच्या वृत्ति व प्रवृत्ति बदलणाऱ्या व घडविणाऱ्या शक्ति दिवसानुदिवस वाढत आहेत, शास्त्रीय विचारसरणी व चौकसबुद्धि यामुळें मानसशास्त्रीय ज्ञान वाढत आहे. शंभर वर्षांपूर्वी, मानसशास्त्र हा शब्दप्रयोगहि माहीत नव्हता, आतां तत्त्वज्ञानाहून मानसशास्त्र निराळें असून, त्यासंबंधी आतां नवीनवी माहिती उपलब्ध होत आहे. एकमेकांशीं सहकार्यानें व सहजीवनानें कसें वागावें हें अद्यापि मानसशास्त्रानें शिकविलें नाहीं असें ब. रसेल यांचें मत आहे.

ज्या लढाईत आपला जय होईल, लुटालूट करावयाला व चैन करावयाला मिळेल ती लढाई चांगली : पूर्वी लिस्बनमध्यें कॅथालिक धर्माविरुद्ध असणाऱ्या लोकांना जिवंत जाळीत असत; त्यापैकीं एकाद्याला गळा दाबून ठार मारण्याची सवलत मिळे. ती गंमत पाहाण्याकरितां लोकांची गर्दी जमत असे. पोलिसांना गर्दी हटविण्याला फार त्रास पडे. एकसारखें तेंच दृश्य पाहणें अशक्य होई व कांहीं-








तरी नवीन दृश्य दिसावें ही भावना यामागें आहे. धर्मद्रोही लोकांना जाळणें हें पुण्यकर्म आहे व तें धार्मिक कृत्य होय ही या मागील भावना आहे; तीच गोष्ट लढाईसंबंधी होय ! दुष्ट प्रवृत्तीचे दणकट लोक दुर्बलांवर अत्याचार करतात, त्यांना लढाई ही आनंद देणारी गोष्ट वाटते व त्याला धार्मिक अगर नीतीचा आधार मिळाला तर अधिक चागलें. ( Unpopular Essays p. 189 ).

आपल्या स्वत्वाच्या अभिमानाला आधार पाहिजे ही सर्व मनुष्यांमध्यें सुप्तभावना असते, त्याकरितां तो काल्पनिक गोष्टी निर्माण करितो. आपण सुखी व्हावें समाधानी असावें असें सर्वांनाच वाटतें. स्व-गौरवाची आवड ही भावना श्रेष्ठ आहे म्हणून मानव म्हणतो, जगामध्यें मनुष्यप्राणी श्रेष्ठ होय. परमेश्वरानें मनुष्यप्राणी निर्माण करण्यांत निसर्गानें हेंच सिद्ध केलें आहे. " आम्ही अमेरिकन, तेव्हां अमेरिका हा परमेश्वराचा देश होय. आम्ही गोरे, म्हणून परमेश्वरानें हॅम् व त्याचे वंशज जे काळे लोक त्यांना शाप दिला आहे. आम्ही कॅथालिक अगर प्रॉटेस्टंट — जसें असेल तसें — कॅथालिक वा प्रॉटेस्टंट हे वाईट व त्याज्य होत. आम्ही पुरुष म्हणून स्त्रिया या हेकट व दुराग्रही; आम्ही स्त्रिया तर पुरुष दुष्ट; आम्ही पौर्वात्य म्हणून पाश्चिमात्य जंगली. आम्ही डोक्याचीं कामें करतों म्हणून सुशिक्षित वर्ग हा श्रेष्ठ होय. हातांनीं काम करतों म्हणून कामकरी श्रेष्ठ. आम्हीच अपूर्व व श्रेष्ठ, ह्या विचारांच्या पाठिंब्यानें आम्ही जगाशीं तोंड द्यावयाला तयार होतों. हे विचार आमचे नसतील तर आमचें धैर्य नष्ट होतें. सर्व समान आहेत ही विचारसरणी आम्ही शिकलों नाहीं, त्यामुळें अहंगंडाची भावना वाढते, व मत्सर व द्वेष वाढतो.

" To Face danger without Hysteria " या लेखांत बर्ट्रांड रसेल म्हणतात मानवी भावनांचा सामुदायिक उद्रेक जसा पाहावयाला सांपडतो तसा पशुपक्षामध्यें सुद्धां दिसून येतो. मध्यआफ्रिकेच्या जंगलांत एकदां हत्तीच्या कळपावरून विमान घरघर करीत गेलें. तेव्हां सगळे हत्ती सैरावरा पळूं लागले व झाडेंझुडपें उध्वस्त केलीं. विमान दूरवर गेल्यावर त्याची ती घरघर थांबली तेव्हां ते आपोआपच शांत झाले. कळपानें राहाणाऱ्या प्राण्यांत व समाजांत एकत्र राहाणाऱ्या प्राण्यामध्यें सामुदायिक भीति अगर आनंद व्यक्तिव्यक्तींच्या अनुभवावरून इतरांमध्यें प्रसृत होतो. स्वार्थ अगर स्वार्थीभावना पशूंप्रमाणें मानवी प्राण्यांतहि आहे; त्याकरितां धर्म व नीति-नियमांची आवश्यकता समाजाला वाटते.

चार्लस डार्विनच्या उत्क्रांतितत्त्वाला कॅथालिकांचा नेहमीच विरोध असे. एडमंड गॉसच्या वडिलांनीं विरोध करतांना असें म्हटलें आहे कीं, इ.स.पू.४००४ या वर्षी पृथ्वीची संपूर्ण झाडमांडासह उत्पत्ति झाली. मनुष्याची स्मरणशक्ति ही चुकीची असूं शकते. पृथ्वीची अशीच्या अशीच एकदम निर्मिति झाली किंवा पांच मिनिटांपूर्वी सर्व कागदपत्रांसह निर्माण झाली. ही कल्पना चुकीची आहे पण तर्कानें ती नाकारतां येणार नाहीं.

Now, apart from arguments as to the proned fallibility of memory, there is one awkward consideration which the sceptic may urge. Remembering which occurs now, cannot possibly —he may say — prone that, what is remembered occurred at some other time, because the world might have sprung into being five minutes ago, exactly as it then was, full of acts of remembering which were entirely misleading. (—Outline of philosophy. p. 7 ) मानसशास्त्रीय मुख्य उद्देशांचें स्पष्टीकरण करतांना बर्ट्रांड रसेल म्हणतात कीं, मनुष्यामध्यें ' गोळा करण्याची व मिळविण्याची हाव, ' अभिमान —

अगर–अहंकार, स्पर्धाळूवृत्ति आणि सत्ता–संपादनाची आवड" ह्या वृत्ति दिसून येतात. राजकारणामध्यें जो मनुष्य या गोष्टी आपण कृतींत आणूं शकूं असें सांगून पटवून देऊं शकतो त्याला समूहावर मात करतां येते व त्यांचीं मतें तो मिळवूं शकतो. दोन अधिक दोन चार नसून पांच आहेत हें तो सिद्ध करतो व तें त्यांना पटतें; त्याची सत्ता ही परमेश्वरापासून आलेली आहे असें सांगतो. आणि ज्या राजकीय पुढाऱ्याला हें जमत नाहीं, तो मागें पडतो व त्याला मतें मिळत नाहींत. हें मानसशास्त्रीय ज्ञान यशस्वी राजकीय पुढाऱ्यांच्या शिक्षणांत विशेषत्वानें आढळून येतें.

**शैक्षणिक मतें.**

गणितशास्त्र व तत्त्वज्ञान यासंबंधी निरनिराळे नव विचार बर्ट्रांड रसेल यांनी प्रदर्शित केले आहेत. त्यामानानें शैक्षणिक क्षेत्रांत नवे विचार फारसे नाहींत. तथापि जुन्या शिक्षणपद्धतीचा त्यांनीं निषेध केला आहे. शास्त्रीय विचारसरणी, स्वतंत्र विचार व पूर्ण विचारांती चौकशी करून ज्ञान मिळविण्यावर त्यांनीं विशेष भर दिला आहे. शिक्षण क्षेत्रांत दडपण, सरकारी नियंत्रणें व सेन्सारशिपची टांगती तलवार असूं नये असें त्यांचें स्पष्ट मत आहे. सन १९२७–१९३२ पर्यंत त्यांनीं आपल्या पत्नीसमवेत डोरा विनिफ्रेड ब्लॅक तरुण विद्यार्थ्यांकरितां शाळा चालविली होती. सन १९०० पासून त्यांनीं इंग्लंडभर व्याख्यानाचा दौरा काढला होता. केंब्रिज विश्वविद्यालयांत त्यांचीं व्याख्यानें झालीं. तशींच अमेरिकेंतहि मोठा प्रवास करून तेथील विश्वविद्यालयांत व्याख्यानें दिलीं आहेत. शिकागो, कॅलिफोर्निया येथें त्यांचीं व्याख्यानें झालीं आहेत. पेकिंग–चीनच्या राजधानींत–त्यांनीं व्याख्यानें दिलीं आहेत.

शैक्षणिक क्षेत्रांत शास्त्रीय ज्ञानाची जोपासना करून ( Scientific altitude ) योग्य निर्णय करण्याची पात्रता विद्यार्थ्यांना आली पाहिजे. मनाची प्रगति शास्त्रीय चिकित्सेनें होते व खरें ज्ञान अनुभव व मानसिक संवयी यांवर अवलंबून आहे. विद्यार्थ्यांना हें पटत नाहीं. व आवडत नाहीं. ठराविक प्रश्नांची ठराविक उत्तरें त्यांना हवींत. स्वतः विचार करून शास्त्रीय चिकित्सेच्या निकषावर घासून स्वतः निष्कर्ष काढण्याला ते तयार होत नाहींत. यामुळें शिक्षणाचा खरा खेळखंडोबा झाला आहे. विद्यार्थ्यांना ज्ञान मिळविण्याचा खरा मार्ग म्हणजे शास्त्रीय चिकित्सा पद्धति, सूक्ष्म निरीक्षण व स्वतःचा बरावाईट अनुभव. हेंच खऱ्या शिक्षणाचें धोरण असावयास पाहिजे. जुनें तें सोनें अगर जुनें तें त्याज्य अशी आंधळी वृत्ति नको. डोळस ज्ञान पाहिजे तर चिकित्सा पद्धति, अनुमान, तर्कपद्धति व पूर्वग्रहांपासून अलिप्त विचारसरणी हवी असें बर्ट्रांड रसेल यांचें मत आहे. "एज्युकेशन अँड दि सोशल ऑर्डर" व "ॲथारिटी अँड इंडिव्हिज्युअल्" या ग्रंथांत त्यांनीं आपलीं शिक्षणविषयक मतें स्पष्ट मांडिलीं आहेत.

शिक्षणक्षेत्रांत संपूर्ण स्वातंत्र्य असावें कीं ताठर तत्त्वें असावींत व त्याप्रमाणें तें दिले जावें याचा ऊहापोह ते करतात. दुसऱ्या महायुद्धांत, हिटलरच्या जर्मनीमध्यें जशी शिक्षणानें एक स्वतंत्र पिढी निर्माण करण्यांत आली व त्याचे दुष्परिणाम जगाला भोगावे लागले. मध्ययुगीन काळांत शास्त्रीय चिकित्सक बुद्धीला वाव न दिल्यामुळें सारें युरोपखंड अज्ञानावस्थेंत निद्रित होतें. पोपच्या धार्मिक मतांविरुद्ध कोणी बोलल्यास तो नामशेष होऊन जाई, त्यामुळें शिक्षणाची वाढ व शास्त्रीय ज्ञानाची परंपरा नष्ट झाली. प्रयोग करून स्वतंत्र विचार करून व पिढीजाद जुन्या कल्पनांचें आवरण दूर करून आणि मोठ्या विद्वानांच्या मतांचें दडपण दूर सारून आपलीं मतें ठरविलीं पाहिजेत तरच खरें ज्ञान मिळूं शकेल. अमेरिकेंतील प्रख्यात शास्त्रज्ञ ओफेनमीर यांना हायड्रोजनबॉंबची आवश्यकता न








पटल्यामुळें त्यांना नालायक ठरवून, खालीं ओढ- ण्यांत आलें. अमेरिकेंतील सरकारी पोलीसदलाच्या सामान्य बुद्धि-पातळीवरून परदेशीय शास्त्रज्ञांना पासपोर्ट अगर व्हिसा मिळत नाहींत. याचा परिणाम आंतरराष्ट्रीय शास्त्रज्ञांच्या अगर विद्वानांच्या परिषदा तेथें होत नाहींत. "पोर्ट्रेट्स् फ्रॉम मेमरी" या ग्रंथात त्यांनी अमेरिकेंतील सरकारी धोरणावर ताशेरा झाडला आहे.

मतपरिवर्तन हें आवश्यक आहे. खरी गोष्ट पाहून व अनुभव घेतल्यावर मत बदलण्यांत कोण- ताच कमीपणा नाहीं. मी माझी मतें बदललीं आहेत याबद्दल मला कोणत्याहि प्रकारची लाज अगर खंत वाटत नाहीं असें तें स्वतः "डिक्शनरी ऑफ माइंड" मॅटर व मॉरल्समध्यें प्रस्तावनेंत म्हणतात. सन १९०० मधील शास्त्रज्ञांचीं मतें गेल्या पन्नास साठ वर्षांत पार बदलून गेलीं आहेत. तत्त्वज्ञान म्हणजे धार्मिक ज्ञान नसून शास्त्रीय ज्ञान होय त्यांत बदल होऊं शकेल. धार्मिक ज्ञानाचीं नीतितत्त्वें हीं प्राचीन कालापासून तींच आहेत त्यांत बदल होणार नाहीं.

धार्मिक ज्ञानाच्या जोरावर कांहीं लोक सत्याची व शास्त्रीय ज्ञानाची गळचेपी करूं पहातात. उदाहर- णार्थ, विकास व उत्क्रांति वादाची शिकवण बेकायदे- शीर आहे असें सांगितलें जात असे. आपलें म्हणणें खरें असेल तर आपण चर्चा करून पटवून देऊं शकता, बुद्धीला पटेल तर आपण आपलें मत बदललें पाहिजे; नवा अनुभव, नवीं प्रमाणें व अनु- भव यांवरून आपल मत ठरविलें पाहिजे; पण जुलुमजबरदस्ती करून व ठराविक पद्धतीचें शिक्षण देऊन मुलांची मनें व वृत्ति मारून टाकतां कामा नयेत. बालवयांतील कोवळ्या वृत्तीच्या मुलांना ठराविक सांच्याच्या शिक्षणानें मारून त्यांचीं मनें कायमचीं खुजीं व बुरसटलेलीं करणें हें घातकीपणाचें आहे पण हें सर्व सुधारलेल्या राष्ट्रांत सर्वत्र चालत आहे :

Unfortunately it is practised in a greatar or less degree in the schools of every civilized country. (—Human society in Ethics and Politics. P. 36.)

विनोदीभावना व उपरोधिक लिखाण याबाबतींत बर्ट्रांड रसेल हे मोठे रोचक व खोचक लेखक आहेत. उपहास करतांना ते आपल्या जवळच्या लोकांचा उल्लेख करणार नाहींत. जॉर्ज बर्नार्ड शॉ यांच्याप्रमाणें ते अतिरेकी फटकळपणा करणार नाहींत. धार्मिक समजुतींना धक्का देणारे विचार ते मोठ्या खुषीनें विनोदाच्या शर्करेंत घोळवून वाचकांपुढें मांडून त्यांच्या बुद्धीला ते चालना देतील. वाचकांना आपल्या विश्वासांत घेऊन समा- जाच्या रूढकल्पनांवर ते सपाटून आघात करतील. प्रत्यक्ष प्रमाण पाहून सत्य पडताळून पाहाव- यास पाहिजे, इतरांचीं सांगोवांगी मतें काय कामाचीं ? पण सतराव्या शतकापूर्वी हें कोणाला पटत नसे. मोठ्या माणसांनीं व प्राचीन वयोवृद्धांनीं सांगितलें तें खरें वाटत असे, व खऱ्याखोट्याचा पड- ताळा कोणी पाहात नसेल त्या विरुद्ध बोलणें म्हणजे मृत्यूला आमंत्रण देण्यासारखें असे. अरिस्टॉटल म्हणतो, "बायकांना पुरुषांपेक्षां कमी दांत असतात" त्यानें जरी दोन लग्नें केलीं होतीं तरी त्यानें आपल्या बायकोचें तोंड उघडून कधीं दांत मोजून पाहिले नाहींत. उत्तरेकडून वारा येत असतां गर्भधारणा झाली तर मुलें निरोगी होतात, पण दोन्ही श्रीमती ॲरिस्टॉटलबाईंना घराबाहेर जाऊन वाऱ्याची दिशा पाहून, शेजघरांत जावें लागत असावें असें वाटतें. तो म्हणतो कुत्रा चावला तर मनुष्य वेडा होणार नाहीं, पण दुसरा एकादा प्राणी होईल. उंदराचें— मादीचें—वीष, ती घोड्यांना चावल्यास बाधतें पण ती मादी गर्भार असेल तर अधिक बाधतें. तसेंच











निद्रानाशानें पिसाळलेला हत्ती, मीठ, ऑलिव्ह तेल व गरम पाण्यानें त्यांचे खांदे व गंडस्थळाजवळील भाग चोळले असतां बरा होतो. अशाच तऱ्हेची अरिस्टॉटलचीं मतें आहेत; पण आमचे विद्वान लोक असे कीं, ज्यांनीं मांजरें व कुत्रे यापेक्षां इतर प्राणी पाहिलेले नाहींत. ते अरिस्टॉटलची त्याच्या सूक्ष्म-निरीक्षणाबद्दल स्तुति करतात !

Nevertheless, classical dons, who have never observed any animal except the cat and the dog, continue to praise Aristotle for his fidelity to observation. " Page 47.

– Impact of Science in Society.

डॉ. मेरीस्टोप्सची संततिनियमनावरील पुस्तकांना बंदी नाही. कारण ती शिक्षितांशिवाय इतरांना समजत नाहींत, पण मिसेस् सेंजर्स बाईंच्या पुस्तिकांना बंदी घालण्यांत येते. खरें पाहतां श्रीमंतापेक्षां व सुशिक्षितांपेक्षां रोज मजुरी करणाऱ्या कामगारांच्या वाढत्या प्रजेला आळा बसावयास पाहिजे. पण कायदा उलटा आहे; तो बदलला पाहिजे असें बर्ट्रांड रसेल म्हणतात.

### कल्पित कथा

मनुष्यप्राणी हा माकडापासून उत्क्रांत झाला हें विकासवादाचें तत्त्व डार्विन यांनीं सांगितल्यापासून युरोपांतील तथा कथित शिक्षणशास्त्रज्ञांत मोठी खळबळ उडाली. ते म्हणतात : " मनुष्य हा प्राचीन काळीं झाडांझुडपांवर राहाणाऱ्या माकडांपासून निर्माण झाला. झाडींची कोवळीं पानें, फुलें, फळें खाऊन त्यांनीं उष्णकटिबंधांतील दिवस घालविले. एकमेकांच्या अंगावर नारळ फेकून ते खेळ खेळूं लागले व नारळ फोडून खाऊं लागले. निरनिराळया प्रकारच्या उड्या मारण्यांत व कसरतीचीं कामें करण्यांत त्यांचा वेळ केव्हां जात असे हें समजत नसे. अशीं हजारों लाखों वर्षें झालीं; त्यांची प्रजा फार वाढली व त्यांना नारळ पुरत नाहींसे झाले. लोकसंख्या वाढली व नारळ कमी, म्हणून या वाढत्या लोकसंख्येचा प्रश्न त्यांनीं मोठ्या कौशल्यानें सोडविला. जे जंगलाच्या मध्यावर राहिले होते. त्यांनीं दुसऱ्यांना नारळांनीं बरोबर टिपून काढून त्यांना लंगडे थोटे केलें, कांहीं अर्धमेले झाले, व त्यामुळें त्यांच्या मृत्यूमुळें अन्नधान्याचा प्रश्न थोड्याफार प्रमाणांत सुटला. जंगलाच्या कडेला असलेल्या माकडांनीं सपाटप्रदेशांतील निरनिराळीं चविष्ट फळफळावळें पाहिलीं व त्यांवर ते ताव मारून अन्नधान्याचा प्रश्न आपल्यापुरतां सोडविला. जंगलांतील उंच झाडांवरून ते सपाट प्रदेशांतील फळझाडांच्या बागांत राहून आपला स्वतंत्र चरितार्थ चालवूं लागले. आणि सपाट प्रदेशांत आल्यावर त्यांना दिसून आलें कीं दुसऱ्याला मारण्याकरितां नारळापेक्षां दगड चांगले व ते येथें मुबलक आहेत, व ते परिणामकारकहि आहेत. ( New Hopes for a changing World p. 21. ) मानवी प्राण्यांचा संहार कसा केला जातो याची मोठें सुंदर विडंबनात्मक कथा त्यांनीं येथें वर्णिली आहे. युद्धें अटळ आहेत काय हा आजचा पडलेला प्रश्न अणुबॉंब व हायड्रोजनबॉंब यांनीं सुटणार नाहीं. तथापि दुसऱ्यांचा नाश करण्याकरितां निरनिराळीं शस्त्रास्त्रें निर्माण होत आहेत, व वाढत्या लोकसंख्येचा प्रश्न लढाईनें सोडविला जातो हें योग्य आहे काय ? शास्त्रीय ज्ञानाचा उपयोग मानवी जीवन अधिक सुखी, समाधानी करण्याकडे झाला पाहिजे याबद्दल त्यांनीं पुष्कळ लेख लिहून आपलीं मतें स्पष्ट केलीं आहेत.

### राज्यशास्त्र

बर्ट्रांड रसेल यांना नोबेल पारितोषिक मिळालें त्या वेळेचें भाषण अत्यंत महत्त्वाचें असून, त्यामध्यें त्यांचीं राज्यशास्त्रीय मतें स्पष्ट होतात. न्यू होप्स फॉर चेंजिंग वर्ल्ड आणि ऑथॉरिटी अँड










इंडिव्हिज्युएल " सतान इन् धी सबर्ब " या व इतर लेखांवरून सर्वाधिकारशाहीबद्दलचा त्यांचा तिरस्कार व्यक्त होतो. पार्लमेंटमध्यें हाऊस ऑफ लॉर्डसचे ते सभासद होते. पहिल्या महायुद्धाचे वेळीं त्यांनीं लढाईला प्रामाणिक विरोध करणाऱ्यांच्या समर्थनार्थ एक पुस्तिका लिहिली त्याबद्दल त्यांना शंभर पौंड दंड झाला होता. त्यानंतर त्यांना संपावर गेलेल्या कामगारांच्या विरुद्ध पोलिसांनीं व अमेरिकन सैनिकांनीं काय काय गोष्टी केल्या त्याची माहिती सरकारी कॉंग्रेसच्या रिपोर्टांतील प्रसिद्ध केली म्हणून सहा महिने शिक्षा झाली. शांततावादाचा पुरस्कार केल्याबद्दल लोकमत त्यांच्याविरुद्ध झालें होतें. लढाईनें कोणताच प्रश्न सोडविला जात नाहीं असें मित्रराष्ट्रांना व युरोपांतील राष्ट्रांना त्यांनीं सांगितलें. १९३० च्या सुमारास हिटलरचा व मुसोलिनीचा उपसर्ग वाढला तेव्हांच त्यांनीं आपली मतें बदललीं. १९२० पासून रशियांतील दौरा केल्यापासून त्यांचा साम्यवादाला संपूर्ण विरोधच आहे.

ॲटमबॉंबचा उदय झाल्यापासून राष्ट्रांतील कलह वाढत गेले व लढाई सुरू झाली तर अपरंपार हत्या व नाश होऊन सर्वत्र उजाड होऊन जाईल. त्यामुळें खरा जय कोणाचा होईल काय ? सर्व विनाश टाळण्याकरितां त्यांनीं प्रसिद्ध शास्त्रज्ञ आइन्स्टाईन व इतर नऊ शास्त्रज्ञ यांच्या स्वाक्षरीनें एक ठराव ९ जुलै १९५५ मध्यें प्रसिद्ध केला. त्याच दिवशीं आइन्स्टाईन मरण पावले. चार बड्या राष्ट्रांच्या व्हिएन्ना येथील परिषदेकरितां हा ठराव सर्व विनाश टाळण्याकरितां प्रसिद्ध करण्यांत आला होता. तो ठराव असा होता : " कोणत्याहि युद्धांत आतां अणुबॉंब वापरण्यांत आल्याशिवाय राहाणार नाहीं, आणि मग मानवाचा नाश अटळ आहे म्हणून आम्ही शास्त्रज्ञ सर्व राष्ट्रांना विनंति करतों कीं आपापसांतील तंटे व भांडणें त्यांनीं सामोचारानें मिटवावीं. " निकेता क्रुश्चेव्ह व प्रेसिडेंट आयसेनहोअर यांची अमेरिकेंतील भेट अणुबॉंब व शस्त्रास्त्र कपात चार वर्षांत करावी याची चर्चा करीत आहेत, यावरून बर्ट्रांड रसेल यांचें मत पटूं लागलें आहे हेंच खरें.

## सर्वाधिकारशाही

सरकारचा मूर्खपणा किती अचरटपणाचा असूं शकेल याचा उपहासपूर्ण उल्लेख त्यांनीं " अन्पॉप्युलर एसेज " यामध्यें केला आहे. मला मोठें सैन्य द्या, त्यांना भरपूर पगार देऊन उत्तम खाण्यापिण्याची व्यवस्था करा, तीस वर्षांमध्यें कोणतींहि अशक्य विधानें दोन अधिक दोन तीन, पाणी उकळल्यानें थंड होतें, अगर थंड केल्यानें उकळतें अशी अशक्य विधानें बहुमतानें मान्य होतील असें मीं करून दाखवीन. असें असलें तरी पाणी उकळविण्याकरितां किटली रिफ्रेजिटरमध्यें कोणीच ठेवणार नाहीं; थंडीनें पाणी उकळतें हें " रविवारचें सत्य " मोठ्या गांभीर्यानें व शांतपणानें पाळावयाचें व म्हणावयाचें; पण त्याप्रमाणें करावयाचें नाहीं. जे जे लोक या विधानाला आक्षेप घेतील त्यांना ठार करावयाचें अगर नामशेष करावयाचें. हें सरकारी तत्त्व जो कोणी मान्य करणार नाही त्याला नोकरी द्यावयाची नाहीं, त्याला शिकवावयाला नेमावयाचें नाहीं. फक्त उच्चाधिकाऱ्यांनीं चहापितांना या सरकारी सत्याची हंसत हंसत कुचेष्टा केली तरी चालेल. ( Unpopular Essays p. 124 )

लोकसंख्येची बेसुमार वाढ झाल्यामुळें ख्रिस्ती मिशनऱ्यांनी आफ्रिकेंतील जंगली लोकांची सुधारणा निरुपयोगी झाली आहे. ते समजतात कीं आपली हानी गोऱ्या लोकांनीं केली, त्यांनीं आपल्याला लुबाडलें ही भावना तेथें प्रबल आहे. जर यदाकदाचित लायकी न येतां एकदम स्वराज्याचे हक्क त्यांना मिळाले तर त्यांची झालेली प्रगति लवकरच नष्ट होईल, हें कटु सत्य आहे. हेटी बेटांतील हा अनु-



अनुक्रमणिका

मत अगदीं ताजा आहे. आज धान्याच्या किमती वाढत आहेत, पण आपण सर्वजण सरकारला त्याबद्दल दोष देतो. सरकारच्याविरुद्ध समाजवादाचा अंगिकार करतो अगर आपलें सुधारलेलें सरकार असेल तरी त्याच्या विरुद्ध प्रचार करतों. दोन्ही गोष्टी चुकीच्या आहेत. कोणतेंहि सरकार सत्तारूढ झालें तरी त्याला या परिस्थितींत कांहींच फरक करतां येणार नाहीं, कारण नैसर्गिक कायदे त्याच्या विरुद्ध आहेत, आणि त्यांवर मात करण्याला लागणारी सखोल बुद्धिमत्ता, कोणत्याच मानव समूहानें दाखविली नाहीं. All Governments, whatever their political complexion are at present willy–nilly in the grip of natural forces, which can only be dealt with by a degree of intelligence of which mankind, hitherto has shown little evidence. ( Page 38 )

— New Hopes for a Changing World.

## नीतिशास्त्रविषयक मतें

मनुष्यानें भीति, जुन्या समजुती व जुन्या रूढी यांचें दास्य सोडून दिल्याशिवाय त्याचा खरा उत्कर्ष होणार नाहीं. शत्रूंचें नुकसान व्हावें अशी इच्छा न करतां बंधुभाव वाढेल असा विचार करावा. हें जरी सर्वांना मनोमन पटलें असलें तरी त्याप्रमाणें कोणीच वागत नाहीं. तो सर्वसाक्षी दयाळू, सर्वव्यापी, शहाणा दूरदर्शी परमेश्वर मृत्युशय्येवरील असाध्य रोगी विव्हळत राहून कॅन्सरचें मरणप्राय दुःख भोगीत असलेलें पाहून आनंद मानितो किंवा जो त्याचें दुःख कमी करतो त्याला शिक्षा करील व त्यावर रागावेल ? अशा तऱ्हेनें प्रश्न विचारून आपले मुद्दे ते पटवून देण्याचा प्रयत्न करितात. त्याचें नीतिशास्त्र बुद्धिप्रामाण्यांवर आधारलेलें आहे जगांमध्यें खुळया रूढी अणि कूपमंडूकवृत्ति असू नये अशी समाजरचना झाली पाहिजे, दुसऱ्यांचा नाश करणारें ज्ञान जनतेला देतां कामा नये, दया प्रेम व सहानुभूति हे सद्‌गुण वाढीस लागले तरच नवी समाजनिर्मिति होऊन सुख व समाधान वाढेल. अशा तऱ्हेचे विचार त्यांच्या ग्रंथांत आढळतात. Conquest of Happiness, " Human society in Ethics,– A History of Western Philosophy " यामध्यें त्यांनीं आपले विचार उत्कृष्टपणें मांडले आहेत. आजकाळच्या स्वातंत्र्याच्या काळांत त्यांच्या या बहुमोल ग्रंथांची मराठी व इतर प्रांतिक भाषेंत भाषांतरें झालीं पाहिजेत व धनिक सरकार व प्रकाशक यानीं मनावर घेऊन हीं कामें केलीं पाहिजेत. मध्यवर्ति सरकार अशा उपक्रमांना मदत केल्याशिवाय राहाणार नाहीं. मराठी जनतेला, बर्ट्रांड रसेल यांच्या जीवनांतील चढउतार व सुबोध व स्पष्ट मतें खडकाळ, दरीखोऱ्यांतील झुळझुळवहाणाऱ्या निसर्ग रमणीय झऱ्याप्रमाणें आनंददायक व स्फूर्तिप्रद वाटल्याशिवाय राहाणार नाहीं. त्यांच्या ग्रंथाचें वाचन व मनन आपल्याला त्यागी व सहृदय जीवन जगण्याला मार्गदर्शन करील यांत शंका नाहीं. ते म्हणतात, कायदा म्हणजे काय ? सत्ता चालविणाऱ्या संघाचा तो नियम होय; इर्छीच्या कल्पनेप्रमाणें तो योग्य अगर बरोबर असेल असें नाहीं. जुन्या जर्मन राष्ट्रांत, खुनी माणसाला त्याच्या समाजांतील स्थानाप्रमाणें कमीअधिक दंड होत असे. जपानमध्यें वरिष्ठापुढें न हंसल्यास तेथल्यातेथें, पूर्वी ठार करण्याची शिक्षा असे. म्हणून जपानी लोक हंसरे दिसतात. गेलीं २८०० वर्षें सुखाचें जीवन घालविण्याच्या विरुद्ध सर्व नीतिशास्त्रज्ञांनीं उपदेश केला आहे. स्टोईकांनीं सुखाचा पुरस्कार करणाऱ्या एपिक्युरिअसचा निषेध केला आहे. मार्क्युस आरेलीसनें खिश्चनांचा छळ केला, तर सिनेकानें नीरोच्या गैरवर्तुणकीला पाठिंबा दिला, स्वतः पुष्कळ पैसा मिळवून भरमसाट व्याजानें कर्जाऊ रकमा दिल्या आहेत. अलीकडच्या काळांत जर्मनींतील प्राध्या-








पक्षांनी श्रेष्ठ वंशत्वाच्या कल्पना निर्माण करून दुसरें महायुद्ध निर्माण करून जर्मनीचा नाश करून घेतला आहे. ह्या सर्व मोठ्या विद्वान लोकांनीं सुखाचा तिरस्कार केला आहे, व त्यांचें अनुकरण कार्लाईल इंग्रजानें केलें आहे. एरवीं क्रॉम्वेलनें आयरिश लोकांची केलेली कत्तल, फ्रेड्रिक धी ग्रेट यानें केलेले अत्याचार आणि गव्हर्नर आयरचे जमेका बेटांतील निघृण अत्याचार समर्थनीय कसे होतील ? (पोर्ट्रेट्स् फ्रॉम मेमरी – पृ. १९८)

प्रॉटेस्टंट म्हणतात कीं रविवारीं काम करणें हें परमेश्वराच्या इच्छेविरुद्ध आहे, तर ज्यू लोक म्हणतात कीं शनिवारच्या कामाला परमेश्वराचा विरोध आहे. हा मतभेदाचा प्रश्न गेलीं १९०० वर्षें चालू आहे आणि तो संपण्याची चिन्हें दिसत नाहीत. हिटलरच्या गॅसचेंबरनें मात्र बरेचसें काम केलें पण शास्त्रीय चर्चा करतांना तो मार्ग बरोबर नाहीं. ज्यू आणि मुसलमान म्हणतात कीं खारवलेलें डुकराचें मांस वर्ज, तर हिंदू लोक म्हणतात कीं गोमांस वर्ज करावें. या मतभेदांपायीं लक्षावधि लोकांच्या कत्तली झाल्या आहेत. तेव्हां परमेश्वराच्या इच्छेनें कांहीं नीतिशास्त्र निर्माण होऊं शकत नाहीं. (ह्यूमन सोसायटी पृ. १०३)

बर्ट्रांड रसेल यांची मतें कोणाला पटतील अगर न पटतील, तथापि मुद्दा पटवून देण्याची पद्धति मोठी आकर्षक आहे. विनोद, उपहास, अतिशयोक्ति वगैरेंचा उपयोग करून ते आपलें लिखाण आकर्षक करतात. त्यांचीं पुस्तकें वाचतांना कंटाळा येणार नाहीं. मूळ ग्रंथांचें वाचन केल्याशिवाय त्यांच्या मतांची स्पष्ट कल्पना येणार नाहीं. तथापि थोडीफार कल्पना येण्याकरितां वरील हकीकत लिहिली आहे. अगदीं अलीकडे "बर्ट्रांड रसेल्स बेस्ट" म्हणून एक पुस्तक राबर्ट. ई. एग्नर यांनीं प्रसिद्ध केलें आहे, त्याच्या आधारानें ही माहिती संकलित करून दिली आहे.

---

सर ज्युलिअन हक्स्ले : अनु. शंकर वि. वैद्य.

# डार्विनचा उत्क्रान्तिवाद

[ चार्लस् डार्विनचा " ओरिजिन् ऑफ स्पेसीज् " हा ग्रंथ प्रसिद्ध झाल्याला १९५९ सालीं शंभर वर्षें पुरीं झालीं. हा शतसांवत्सरिक उत्सव सगळीकडे साजरा झाला व होत आहे. मानवी इतिहासांत डार्विनचें स्थान अनन्यसाधारण आहे. विकासाचें ( इव्होल्युशन ) तत्त्व प्रस्थापित करण्यासाठीं अनेक ज्ञान-शाखांतून गोळा करून त्यानें पुढें मांडलेला पुरावा, " निसर्ग निवडी"चा ( नॅचरल् सिलेक्शन ) त्याचा सिद्धांत, माणूस व त्याचें मन यांच्या उत्क्रांतीसंबंधीं त्याचें निदान, हीं प्रसिद्ध आहेत. डार्विनचा समकालीन वॅलास यानें " जीवशास्त्राचा न्यूटन " असें त्याचें वर्णन केलें आहे, व तें सर्वथैव उचित आहे. भौतिक विश्वाच्या ज्ञानांत जशी न्यूटननें संगति व एकात्मता आणली तशीच डार्विननें जीवशास्त्रांत ! न्यूटनच्या सिद्धांतांचा पुढें जीवसृष्टीच्या ज्ञानावरहि परिणाम घडून आला; तसाच डार्विनच्या विचारांचाहि एकीकडे जड व दुसरीकडे मानवी जीवनाच्या आकलनावर परिणाम झाला आहे. त्याचे विचार सखोल व सर्वव्यापी आहेत. त्याच्या नंतरच्या काळांत सर्व अस्तित्व हा एक प्रचंड विकासक्रम समजला जात आहे.

या शताब्दीच्या निमित्तानें ' हिब्बर्ट जर्नल'च्या ऑक्टोबर १९५९ च्या अंकांत सर ज्युलियन हक्स्ले यांचा एक लेख प्रसिद्ध झाला आहे. डार्विनच्या थोर शास्त्रीय कामगिरीबरोबरच त्यानें एकंदर वैचारिक जीवनावर घडवून आणलेला परिणाम सर ज्युलियन यांनीं स्पष्ट केला आहे. त्याचा थोडक्यांत सारांश येथें देत आहोंत. — का. सं. ]

### डार्विनचा उत्क्रांतीवाद

डार्विनच्या " ओरिजिन ऑफ् स्पेसिज् " या ग्रंथानें जगांतील विचारवंतांना एक जबरदस्त धक्का दिला. डार्विनच्या अभ्यासाचा आवाका एवढा प्रचंड आहे कीं भूगर्भशास्त्र, प्राणिशास्त्र, वनस्पति-शास्त्र अशा अनेक शास्त्रांना त्यानें व्यापून टाकलें आहे. एखाद्याच विषयाच्या एखाद्याच अंगाचा विशेष अभ्यास करणाऱ्या आजच्या शास्त्रज्ञांना डार्विनच्या अभ्यासाची अथांगता पाहून विस्मय वाटतो. डार्विनच्या पुस्तकांची पृष्ठसंख्याच सात हजाराहून अधिक आहे. सुमारें पावणेतीन दशलक्ष शब्दांचा भरणा त्यांत आहे. अनुवांशिकता, जननाचे न्याय, विकासकल्पना, वागणूक, लिंग, पृथ्वीचा रचनाकाल, इंद्रियांचे परस्परसंबंध या संबंधींच्या प्रश्नांची डार्विननें चिकित्सा केली. डार्विनच्या विचारसरणीचा परिणाम इतर अनेक क्षेत्रांवर झाला. भाषाशास्त्र, खगोलशास्त्र, तौलनिक धर्मशास्त्र, सृष्टि-विज्ञान, प्राचीन वस्तु संशोधन शास्त्र अशा अनेक शास्त्रांत उत्क्रांतिवादी दृष्टिकोनाचा अंगिकार करण्यांत आला. सारी विश्वरचना ही एकाच एक उत्क्रांतीचा आविष्कार आहे अशी कल्पना आज उदयास आली आहे. वर्तमानकालीन वैचारिक प्रगतींतहि डार्विनच्या उत्क्रांतिवादाचें स्थान कसें महत्त्वाचें आहे हें पाहणेंहि मोठें उद्बोधक आहे.

विकासवाद किंवा उत्क्रांतिवाद हा सत्य मानला तर जगांतील प्रमुख धर्मांच्या विचारसरणी अक्षरशः कोलमडून पडतील. किंवा त्या विचारसरणी म्हणजे अर्थपूर्ण पौराणिक कथा आहेत असें स्पष्टीकरण








केवळ सोयीसाठीं करावें लागेल. डार्विनच्या सिद्धांतांच्या श्रेष्ठत्वाला येथूनच प्रारंभ करावा लागेल.

न्यूटननें अगोदरच खणून ठेवलेल्या भूमीचें क्षेत्र डार्विननें जीवनापर्यंत विस्तृत केलें. आपापल्या कक्षेंत भ्रमण करणाऱ्या ग्रहांना मार्गस्थ करणारी एक स्वर्गीय शक्ति ख्रिस्ती धर्ममार्तंडांना व देववाद्यांना न्यूटनपूर्वी गृहीत धरावी लागली. न्यूटननंतर मात्र या गोष्टी अनवश्यक व अगदीं अशक्य कोटींतील आहेत असें स्पष्ट दिसून आलें. विश्व हें एखाद्या विराट घड्याळासारखी यंत्रणा असलेलें असें आहे, परमेश्वरानें त्याची रचना करून त्याला अप्रतिहतपणें फिरत ठेवलें आहे आणि तेव्हांपासून तें चक्रनेमिक्रमानें आपोआप फिरत राहिलें आहे अशी विश्वासंबंधींची कल्पना यानंतर अस्तित्वांत आली. यामुळें दैवी अद्‌भुत स्वरूपाच्या गोष्टी अशक्य कोटींत जमा झाल्या. अज्ञानमूलक अंधश्रद्धेंतून निर्माण न झालेल्या परंतु अद्‌भुत वाटणाऱ्या गोष्टी कांहीं असामान्य घडणींतून निर्माण झाल्या असाव्यात किंवा अद्याप सुस्पष्ट न झालेल्या निसर्गाच्या प्रक्रियांतून निर्माण झाल्या असाव्यात असें मानलें जाऊं लागलें. कांहीं कांहीं घटना अशा असतात कीं त्यांच्या निर्मितीचा समूळ कार्यकारणभाव सांपडूनहि त्या माणसाला आश्चर्यकारक वाटाव्या अशाच असतात. एवढ्याच मर्यादित अर्थानें त्यांना अद्‌भुत मानलें जाऊं लागलें. कांहीं स्वर्गीय प्रेरणेमुळें व हस्तक्षेपामुळें त्या अद्‌भुत वाटतात असें मात्र नव्हें.

डॉर्विननंतर अशाच प्रकारचें निसर्गउत्क्रांतिवादाचें तत्त्व जीवशास्त्रालाहि लावलें जाऊं लागलें. स्वयंभू निर्मितीची कल्पना टाकून द्यावी लागली. याच दृष्टीमुळें निर्मिति ही क्रमाक्रमानें होणारें परिवर्तन, भिन्नत्व, किंवा वंशपरंपरागत रचनेच्या एका अथवा कांहीं अत्यंत साध्या घटकांचा विकास असते असें मानलें जाऊं लागलें. जीवनाचें मूळ बीज हें निर्माण केलें नव्हतें तर आपल्या पृथ्वी या ग्रहाच्या इतिहासांतील कोठल्यातरी विशिष्ट अवस्थेला तें निर्जीव (nonliving) द्रव्यामधूनच विकासक्रमानें उत्पन्न झालें असलें पाहिजे हें नंतर मान्य झालें.

गतिमान झालेल्या उत्क्रान्तिचक्राच्या सर्वसाधारण क्रमांत हस्तक्षेप करण्यासाठीं किंवा त्या क्रमचक्राला मार्गदर्शन करण्यासाठीं कांही निसर्गातीत शक्ति साहाय्यक असाव्यात या भ्रमांतहि कोणी राहिलें नाहीं. जीवनप्रपंच हा नैसर्गिक कारणपरंपरेनेंच सिद्ध झाला आहे याची खात्री पटली. जीवशास्त्रीय-रचनेंत वरवर दिसून येणारी हेतुपूर्णता ही कोठल्या तरी स्वर्गीय कारागिरानें जाणीवपूर्वक निर्माण केलेली आहे असें म्हणतां येणार नाहीं. असें आर्चडिकन पाले यांनीं म्हटलें आहे. ही हेतुपूर्णता वरवर पाहतां वाटते परंतु निसर्गनिवडीच्या अजाण व स्वयंचलित प्रेरणांनीं तिला अस्तित्वांत आणली आहे. डार्विननें असें म्हटलें आहे कीं, एखाद्या इंद्रियरचनेचें विशिष्ट व्यक्तित्व केवळ दुसऱ्या इंद्रियसंस्थेच्या उपयोगासाठीं निर्माण झालें आहे असें दाखविणारें एखादें उदाहरण जरी अस्तित्वांत आहे असें दिसलें तरी निसर्ग-निवडीची विचारप्रणाली त्याज्य मानावी लागेल. 'दि मीनिंग ऑफ इव्होल्युशन' या पुस्तकांत श्री. जी. जी. सिम्पसन म्हणतात की, निसर्ग–निवड ही भावी परिणामांचा विचार केव्हांहि करीत नाहीं. किंवा गृहीत धरीत नाहीं. तात्पर्य उत्क्रांन्ति ही प्रसंगनिमित्त उन्मेषांच्या मालिकेनें चालू असते. इन्द्रियांच्या रचनाकृति या आदर्श आकार धारण करतीलच असें नाहीं असें अनेकदां दृष्टोत्पत्तीस येतें. डांस किंवा टेपवर्म यांचा कांही उपयोग असतो म्हणून ते निर्माण होत असतात काय? याचें उत्तर हें कीं कांही विशिष्ट परिस्थितींत (ecological conditions) मध्यें ते जगूं शकतात इतकेंच.

खगोलशास्त्रानें आपली अवकाशाविषयींची कल्पना व्यापक केली. त्याप्रमाणें उत्क्रान्तिवादानें कालमितीची कल्पना व्यापक केली. उत्पत्तिस्थिति



अनुक्रमणिका







ल्याविषयीं युगाच्या भाषेंत बसविलेलें गणित किंवा एकोणीसाव्या शतकांतील पदार्थविज्ञानशास्त्रानें मांडलेलीं अनुमानें यांच्या पलीकडे झेप घेऊन जीवनाच्या प्राचीनत्वाची मर्यादा विज्ञानानें खूपच वाढवली आहे. जीवनाचा भूतकाळ अडीच अब्ज वर्षाहूनहि प्राचीन असावा, व पृथ्वीवरील जीवन आपल्या उत्क्रान्तीसाठीं आणखी इतकाच काळ घेऊं शकेल असें आज मानलें जातें.

अनुवांशिकतेचे न्याय व त्यांत होणारे फेरफार याविषयींच्या आपल्या नव्या ज्ञानानें व कृत्रिम -निवड केल्याच्या योगानें निसर्गनिवडीचें क्षेत्र व्यापक झालें आहे. किरणोत्सर्गी उष्णतेच्या साह्यानें धान्यवनस्पतींच्या ठिकाणीं आपण कृत्रिम उपचारांनीं बदल घडवून आणूं शकतों. आपल्या जातिवैशिष्ट्या-तून बदल वा रूपांतर घडविण्याची क्रिया वनस्पती-मध्यें अत्यंत सावकाशपणें होत असते. आपण आपणांस हव्या त्या वनस्पति निवडून व त्यांचें पुन्हां एकत्रित संयोजन करून आपण त्यांतून नव्या जातीची निर्मिति करतो. निसर्ग-निवडीच्या न्यायानें जें घडायला लक्षावधि वर्षें लागलीं असतीं तें आपण कांही दशकांत साध्य करूं शकलों. कृत्रिम गर्भधार-णेनें याच प्रकारचें कार्य प्राणिजगांत घडलें आहे, ' आउट ऑफ दि नाइट ' या पुस्तकांत श्री. एच्. जे. म्यूलर यांनीं म्हटल्याप्रमाणें याचाच उपयोग सुप्रजाशास्त्रांत निर्मितीसाठीं व्यवहार्यपणें करता येण्याचा मार्ग खुला झाला आहे.

निओडार्विनिअन् पद्धतीनें पतंग या कीटकांवर झालेल्या परिणामांचा अभ्यास कसा केला जातो हेंहि बघण्यासारखें आहे. कारखान्यांनी गजबजलेल्या विभागांत गेल्या ऐशीं वर्षांत हे पतंग कृष्णवर्णी झाले आहेत. परंतु मोकळ्या प्रदेशांवर वावरणाऱ्या कीटकांबाबत मात्र असें घडलें नाहीं. संशोधनानें असें आढळून आलें आहे की हा धुराचा किंवा रासायनिक द्रव्यांचा प्रत्यक्ष परिणाम नाही. तर कृष्णवर्ण जातींची नैसर्गिक निवड झाल्यामुळें असें घडलें आहे. सर्व पतंगजातींत कृष्णवर्णी पतंग विरलत्वानें जन्मतात. परंतु ते प्रभावी असतात. साध्या पतंगापेक्षां कृष्णवर्णी पतंग अधिक टणक व प्रतिकारक्षम असतो. साधे पतंग हे आपल्या रंगाशीं समान रंग असलेल्या वनस्पतींवर दिवसां बसतात. त्यांच्या ठिकाणीं कमी टणकपणा असतो. ही त्यांची उणीव संरक्षणदायी समानरंगत्वानें भरून निघते. कारखान्यांच्या परिसरांतील झाडांचे रंगहि अधिक गडद स्वरूपाचे आढळतात. तेव्हां टणक-पणा उपकारक ठरला. कृष्णवर्णी पतंगाची संख्या प्रत्येक पिढींत इतकी वाढत गेली कीं सातआठ दशकांत कृष्णवर्ण नसलेल्या पतंगांच्या जाती नष्ट झाल्या. आपल्याला मानवणार नाहीत अशा पतं-गांना पक्षी वगळतात हें प्रयोगानें सिद्ध झालें आहे. डी. डी. टी. ला प्रतिकारक्षम असणाऱ्या डासांच्या स्वरूपावर किंवा ॲंटिबायोटिक औषधांनीं बॅक्टे-रियाची सहनशक्ति किती वाढली आहे या संबंधां-तल्या प्रयोगावरून व्यवहारांत महत्त्वपूर्ण ठरणारे न्याय समजून येत आहेत. लोकसंख्येचा बारीक अभ्यास करण्याकडे जीवशास्त्री लक्ष पुरवीत आहेत.

यापेक्षां अधिक सर्वसामान्य पातळीवरून उत्क्रांति ही एक विशिष्ट प्रक्रिया ( Phenomenon ) आहे. या दृष्टीनें याच्याकडे लक्ष पुरवलें जात आहे. उत्क्रांति-चक्र व त्याचे परिणाम यावर लक्ष केन्द्रित होत आहे. त्याची गति कळण्याची समर्थता आपणांत यावी या दिशेनें प्रयत्न होत आहेत.

उत्क्रान्तिवादाची विशिष्ट तत्त्वप्रणालि आहे. उत्क्रान्तीशीं संबंधित असलेल्या कांहीं कल्पना सुस्पष्ट होणें अगत्याचें ठरत आहे. उत्क्रान्तिचक्राची एक मूलभूत गोष्ट म्हणजे त्यांतून उत्क्रान्त होणारी विशिष्ट प्रकारांची परंपरा होय. अगोदर प्रस्थापित झालेल्या प्रकारसमूहांतून नव्या प्रकाराचा जन्म होतो. मूलस्वरू-पापासून नवनव्या स्वरुपांत अशा प्रकारची भिन्नता







आढळते कीं नव्या नव्या प्रकाराची बांधणी अधिक उंच प्रकारची असते. 'उच्चतर', 'नीचतर', 'जीवशास्त्रीय प्रगति' हे शब्द सुस्पष्ट करून त्यांना शास्त्रीय अर्थ प्राप्त करून देण्याचा प्रयत्न व्हायला हवा.

निसर्ग-निवड ही अपरिहार्यपणानें इंद्रियरचनेचा विकास तिच्या जीवनाभोवतालच्या परिस्थितीस अनुरूप ठरेल अशा रीतीनें घडवून आणते असें डार्विननें स्वतः वैशिष्ट्यपूर्ण परिभाषेंत व अत्यंत समर्पकपणें म्हटलें आहे. जीवशास्त्रीय विकास म्हणजे काय ? तो कोणत्या प्रकारचा असतो ? कोणत्या परिस्थितींत घडून येतो याचें स्वरूप आपणांस निश्चितपणें सांगता येणें अवश्य आहे. डार्विन म्हणतो : सर्वच इंद्रियरचना विकास पावत नाहींत. कांही प्रकार स्थिररूप धारण करतात, दीर्घ काल टिकतात. हें केवळ कांही माशांना ( Coelacanth Fish ) किंवा Raptilia सारख्या घटत चाललेल्या प्राणिजातींना लागू आहे असें नाहीं तर जगण्यांत अत्यंत यशस्वी झालेल्या कांही कोळयांच्या जाती, आधुनिक पक्षीजाती किंवा मुंग्या अशा लक्षावधि वर्षांत किंचितच बदललेल्या व टिकून राहिलेल्या जातींनाहि लागू आहे.

विशिष्ट प्राणिजाती सातत्यानें व सुस्थिरतेनें कशा टिकून राहतात ? शरीर संघटनेच्या विशिष्ट रचनेमुळें हें घडतें काय ? विशिष्ट जातिसमूहाच्या विकासाला मर्यादा घालणारे घटक कोणते आहेत ? या प्रश्नांचें संशोधन आज आपण करून पाहणें अवश्य आहे.

आपल्या दृष्टिकोनांत जो आमूलाग्र फरक पडला आहे त्याच्याशीं याचा संबंध आहे. एकोणिसाव्या शतकांतील जीवशास्त्रज्ञांचें लक्ष उत्पत्तींचीं मुळें शोधण्याकडे मुख्यतः लागलें होतें. त्या विषयींच्या विविध शक्यतांविषयीं विसाव्या शतकांतील शास्त्रज्ञ अधिकाधिक जागरुक होत आहेत. तर्कशुद्ध प्रक्रियेंतून विकासवादाची नवी कल्पना निर्माण होत आहे. नवनव्या शक्यतांचा शोध घेणें हें तिचें लक्ष आहे. परंतु विविध प्रकारच्या विचारसरणींनीं तिला सारख्या मर्यादा पडत आहेत. रंग-ज्ञानाची दृष्टि व तपमानाचें नियमन या दोन प्रश्नांचा उलगडा उत्क्रांतिवादाच्या इतिहासांतील विशिष्ट अवस्थेंत होऊं शकेल. मात्र यालाहि कांहीं मर्यादा आहेतच. परंतु माणसानें तयार केलेलीं कृत्रिम इंद्रियें उदा. दूरदर्शक यंत्र, परमाणूलक्षी दुर्बीण अशा अनेक साधनांनीं मानवाच्या दृष्टीचा आवाका फार व्यापक झाला आहे.

कांही जातींत विलक्षण गुणधर्म असतात परंतु साधारणतः ते प्रकट होत नाहींत तर कांहीं वैशिष्ट्यपूर्ण परिस्थितींतच ते प्रकट होतात. चिंपाझीला कागद व रंग दिला तर तो माणूस करतो तशा सुंदर आकृति तयार करील. स्केटिंगमध्यें माणसाला मागें सारील. उत्क्रांतीच्या अभ्यासाचें लक्ष प्राण्यांच्या जीवशास्त्रीय घटकांच्या वागणुकीवर (Behaviour) केंद्रित होत आहे. आजवर मिळविलेल्या ज्ञानामुळेंच या गोष्टी सुस्पष्ट होत आहेत. असें एक मत आहे. दुसऱ्या मतें, तन-मनाच्या गुंतागुंतीवर प्रकाश टाकला जात आहे. जाणीवपूर्वक होणारी वागणूक व मेंदूच्या रचनेची उत्क्रांति यांतील नातें शोधलें जात आहे. मधमाशासारख्या वरच्या वर्गातील प्राण्यांच्या वागणुकींतील गुंतागुंतीवरून असें ध्यानांत येतें की त्यांचा सूक्ष्म मेंदू विविध दिशांनीं कार्य करीत असला पाहिजे. विद्युत् प्रेरकानें मानवी मेंदूवरील आवरणाचें स्वरूप आकलन होत आहे. स्मृति या चैतन्यरूप शक्तीचा जडस्वरूप पाया कळून येत आहे. इंद्रियरचनेकडून होणाऱ्या वागणुकीचा अभ्यास करून त्यावरून सबंध शरीरसंघटनेचा प्रश्न अधिक चांगल्या रीतीनें समजाऊन घेण्यास महत्त्वाचें साहाय्य होणार आहे.












उत्क्रान्तिवादाच्या कल्पना मानवी जीवनाला लावून पाहाण्याच्या एका महत्त्वाच्या टप्प्यापर्यंत आपण शेवटीं येऊन पोहोंचतों. डार्विननें " ऑरिजिन " च्या शेवटीं त्याच्या वैशिष्ट्यपूर्ण नम्रतेनें असें म्हटलें आहे की, " मानव व त्याचा इतिहास यावर प्रकाश टाकला जाईल. " प्रारंभीं मानवाच्या प्राणिवंशजांवर लक्ष दिलें गेलें होतें परंतु आज सबंध मानवी जीवनाच्या प्रश्नावर उत्क्रान्तिवाद प्रकाशझोत टाकीत आहे.

उत्क्रांतितत्त्व सर्व निसर्गांत कार्य करीत आहे हें आपण आतां जाणतों. ठराविक काळांत बदल धारण करीत जाणारी ती एकमार्गी प्रक्रिया आहे. ती कार्यप्रवण असतांना भिन्नता वाढविते, नावीन्य निर्माण करते व विशिष्ट रचनास्वरुपाच्या उच्च पातळीवर जाऊन पोहोचते. म्हणजे प्रत्यक्ष जग हें एक उत्क्रांतिचक्र आहे.

उत्क्रान्ति प्रक्रियेचे तीन भाग करतां येतात. निरींद्रिय ( inorganic ), जीवशास्त्रीय व मानसिक, सामाजिक अधिष्ठान असलेलें मानवी जीवन. पहिल्यांतून दुसऱ्याची. दुसऱ्यांतून तिसऱ्याची निर्मिति झाली. शेवटच्या दोन विभागांचा विचार केला तर निसर्गनिवडीच्या तत्वानें त्यांचा विकास झालेला दिसतो. मानसिक-सामाजिक वैशिष्ट्यांचा विकास हा सांठलेल्या अनुभव-परंपरेनें प्रसृत होणाऱ्या प्रक्रियेंतून होत राहातो. त्यांतून भिन्न सामाजिक गट निर्माण होतात.

जीवशास्त्रीय उत्क्रांतीचे न्याय मानवी व्यवहाराला लावण्याचे अनेक यत्न झाले. जीवशास्त्रज्ञांनीं त्याज्य मानलेल्या कल्पना घेऊन समाजशास्त्रज्ञांनीं त्यांचा उपयोग करून पाहिला. उत्क्रांति ही सतत प्रगतिपर असते व एखाद्या प्रवृत्तिपुरतीच ती मर्यादित असें गृहीत धरून त्यांनीं हे प्रयत्न केले. या उलट इतिहासशास्त्रज्ञ व मानववंशशास्त्रज्ञ यांनीं या खुळ्या कल्पना त्याज्य मानल्या. लहान मुलाला पाण्यांत टाकलें तर तें एकदम पोहूं शकत नाहीं असें उदाहरण ते घेतात. व खऱ्या प्रगतीची कल्पना नाकारतात. सामाजिक संस्था, नीतिसंस्था, या सारख्या संस्थांच्या परस्पर संबंधांवर ते भर देतात. किंवा सातत्यानें होणाऱ्या आवर्तनाच्या कल्पनेकडे माघारी येतात.

सांस्कृतिक उत्क्रान्तीचा विचार करतांना आपण त्याच्या तळाशीं कार्यरत असणाऱ्या प्रक्रियेचें पूर्ण पृथक्करण करावयास हवें. नंतर व्यापक प्रमाणावर त्याचा आढावा घ्यावयास हवा. केवळ सुसंस्कृत समाजव्यवस्था अगर मागासलेल्या जमाती यांच्यावरच टॉयम्बी सारखे मानववंशशास्त्रज्ञ लक्ष केंद्रित करतात पण तें निरुपयोगी आहे.

जीवनाच्या जीवशास्त्रीय किंवा मानसिक सामाजिक बाजूंतील मुख्य भेद म्हणजे माणूस हा सर्वांत प्रभावी नवा जातिप्रकार असला तरी एकाच प्रकारच्या जातिवैशिष्ट्यानें निर्माण झाला आहे. सांस्कृतिक भेद ध्यानांत घेतले तरी हा जातिप्रकार सार्वत्रिक एकात्मतेकडेच झुकणारा आहे. दुसरा महत्त्वाचा भेद म्हणजे सांस्कृतिक उन्नतींत बदलत जाण्याचा विलक्षण वेग असतो हा होय. काळजी वाटावी एवढ्या वेगानें हा बदल घडत आहे. आपणांस नियंत्रण करतां येईल अशा योग्य ठिकाणीं हा वेग स्थिर करणें हें एक भावी कालाचें कार्य आहे. तिसरें म्हणजे प्रगतीचा मुख्य भाग हा ज्ञानाच्या नवनवीन संस्थांच्या निर्मितीवर अवलंबून असतो.

जीवशास्त्रीय उत्क्रांतीप्रमाणेंच सांस्कृतिक उन्नति पायरीपायरीनें होत असते. याबाबत उदाहरणें देतां







येतील. मानवी लोकसंस्थेचा प्रश्न आज बेचैन करीत आहे. अनेक संकटें टाळावयाचीं असतील तर ह्याला कोठेंतरी स्थैर्य यावयास हवें.

तसेंच मानवी जीवनांत उत्क्रान्तीच्या प्रक्रियेविषयीं आज विलक्षण जागरूकता निर्माण झाली आहे. मानवजात सर्वांत प्रभावी ठरली आहे. तीच पुढील उत्क्रांति घडवून आणणार आहे. मानवी शक्यतांचा व त्या समजावून घेण्यासाठीं केल्या गेलेल्या प्रयत्नांतील बारकाव्यांचा अभ्यास उत्क्रांतिवादी दृष्टींतून नजीकच्या भविष्यांत केला जाईल असें भविष्य आज वर्तवितां येईल. मानवाच्या भवितव्याचा जो केन्द्रभूत प्रश्न आहे त्याच्या अभ्यासासाठीं उत्क्रांतिवादाचा व्यवहारांत उपयोग होईल.

---







अनुक्रमणिका

श्री. ना. ब. जोशी

# श्री एकनाथ महाराज व तिरुवेळंदूरचे माधवस्वामी

श्री एकनाथ महाराजांचीं चरित्रें प्राचीन व अर्वाचीन ग्रंथकारांनीं लिहिलीं आहेत. आपल्याकडे आज जी ऐतिहासिक दृष्टि दिसते ती पूर्वी नसल्यानें प्राचीन संतचरित्रें फार अपूर्ण वाटतात. संतांची प्रसिद्धिपराङ्मुखता हें एक अपूर्णतेचें महत्त्वाचें कारण समजतां येईल. संतांच्या आयुष्यांतील अनेक घडामोडीच काय पण साधे नात्यांचे संबंध सुद्धां यथातथ्यपणें न लिहिले गेल्यामुळें प्रत्येक बाबींत संशय निर्माण होतो व कित्येक वेळां दिशाभूलहि होते. संशोधनाची सूक्ष्म नजर सारखी फिरत असतांना सुद्धां कांहीं बनावट कागद, अपूर्ण माहितीचीं टिपणें, मोठ्या संताशीं निकटचा संबंध जोडण्याची वृत्ति, संशोधकांची दिशाभूल करतात. विशेषतः संतांच्या भोंवतीं ज्या विविध आख्यायिका निर्माण केल्या जातात व त्याचें मोठें जाळें विणलें जातें. त्यावेळीं तर इतिहास झांकला जातो व कुठले तरी संबंध कुठे तरी जोडले जातात व गोंधळांत आणखी भर पडते. त्याचा परिणाम म्हणजे संतांचें खरें चरित्र व त्यांचें खरे आप्तसंबंध हुडकून काढणें दुरापास्त होऊन बसतें. श्री एकनाथ महाराजांचें चरित्राबाबतहि असाच प्रकार झाला आहे. नाथांच्या जन्म-शतकापासूनच संशयाला सुरुवात होते. व शेवटीं तो अजमासानेंच घ्यावा लागतो. त्यांचा विवाह केव्हां झाला, त्यांच्या पत्नीचें माहेर कोठलें, नाथांना एकच पत्नी कां दोन पत्न्या इतकेंच नव्हे तर नाथांच्या एकंदर आपत्यांची संख्या किती तीन कीं चार, या व इतर अनेक बाबतींत संशयच संशय दिसून येतात. परंपरेनें व सर्व प्राचीन चरित्रकारांच्या मतें नाथांना अपत्यें तीन– ( १ ) गोदा अथवा लीला ( २ ) हरिपंडित ( ३ ) गंगा. श्री. पांगारकर, आजगांवकर व इतरहि अर्वाचीन लहान मोठ्या चरित्रकारांनीं तीनच अपत्यें मानिलीं आहेत. परंतु अलिकडे म्हणजे गेल्या तेवीस चोवीस वर्षांतील संशोधनानें आणखी एका मुलीची भर पडूं पहात आहे. त्याच संबंधीचे माझे विचार मी आज आपणापुढें मांडणार आहे.

भा. इ. सं. मंडळाच्या शके १८६० च्या आषाढ महिन्याचे अंकांत श्री. चिं. ग. कर्वे यांचा एक लेख प्रसिद्ध झाला. त्यांत त्यांनीं लिहिलें कीं, नाथांच्या दोन मुलींपैकीं दुसरी मुलगी जी गंगा, जी कर्नाटकांत दिली होती असें चरित्रकार सांगतात, ती तंजावर कडील नागनाथास दिली होती व तिचाच मुलगा दक्षिणेकडील तिरुवेळंदूरचा सुप्रसिद्ध मराठी कवि माधवस्वामी. हा लेख प्रसिद्ध होईपावेतो महाराष्ट्रांतील संशोधकानां नागनाथ, माधवस्वामी वगैरे मंडळींची माहिती नव्हती.

श्री. कर्वेंच्या या लेखाचे अगोदर इ. स. १९३२ मध्यें तंजावरच्या सरस्वति महाल ग्रंथालयांतील मराठी हस्तलिखितांची एक सूचि प्रसिद्ध झाली होती. त्या सूचीच्या ५४० व्या पानावर तेथील संग्रहांतील कांहीं माहितीच्या आधारें एकवंशावळ छापली आहे. त्या वंशावळींत जनार्दन शिष्य एकनाथांची मुलगी उमा ही नागनाथास दिल्याचें व तिचाच दुसरा मुलगा माधवस्वामी असल्याचें दाखविलें आहे. त्या वंशावळींतील इतर माहितीची तूर्त आपणास जरूर नाहीं म्हणून ती येथें देत बसत नाहीं. मात्र ही माहिती माधवस्वामींच्या कृष्ण नामक मुलाचा मुलगा वासुदेव यानें आपल्या भागवताच्या नवमस्कंधामध्यें दिलेल्या माहितीवरून व इतर कांही माहितीवरून दिलेली आहे. इतर माहिती कोठील तें तेथें लिहिलेलें नाहीं. या सूचींतील माहितीकडे इकडील संशोधकांचें लक्ष गेलें नाहीं.

श्री. कर्वेंचे नंतर डॉ. शं. गो. तुळपुळे इ. स. १९४६ मध्यें तंजावरकडे मुद्दाम गेले होते तेव्हां त्यांचें लक्ष माधवस्वामी, त्यांचें चिरंजीव माधवसुत, नातु वासुदेव, नातसून मीनाक्षीअम्मा, कन्येकडूनचे पणतु अंबाजीपंडित वगैरेंचे ग्रंथाकडे गेलें. ग्रंथांतील ऐति-

हासिक माहिती एकत्र करून तंजावर सूचींतील माहिती-प्रमाणेंच माहिती असलेला एक लेख रामदास रामदासी-च्या रौप्यमहोत्सव अंकांत शके १८६९ मध्यें डॉ. शं. गो. तुळपुळे यांनीं प्रसिद्ध केला. तीच माहिती त्यांनीं नंतर शके १८७३ मध्यें महाराष्ट्र सारस्वताचें चवथ्या आवृत्तीचें संपादन केलें त्यावेळी पुरवणींत दिली. डॉ. तुळपुळेंच्या ह्या लेखावर अथवा म. सा. पुरवणींतील माहितीवर विशेष अशी प्रतिक्रिया झालेली दिसत नाहीं. फक्त कै. प्रा. पंगूनी मात्र डॉ. तुळपुळेंच्या म्हणण्यास साथ न देतां पूर्णतया विरोधच दर्शविला. प्रा. पंगूनां नाथांची तिसरी मुलगी उमा व तिचा मुलगा माधवस्वामी होत हें डॉ. तुळपुळेंचें मत मान्य झालें नाहीं. या प्रश्नापुरतें त्यांनीं खालील मुद्यावर आधारून विरोध दर्शविला. ते मुद्दे असेः—

( १ ) माधवस्वामी व मुक्तेश्वर जर सख्खे मावसबंधु तर त्यांच्या वयांत ६०–७० वर्षांचें अंतर कसें ?

( २ ) मुक्तेश्वर, हरिपंडित वगैरेंचे वंशवृक्ष प्रसिद्ध झाले आहेत त्यांत गंगाचा मात्र उल्लेख आहे. उमेचा अजिबात नाहीं हे कसें ?

( ३ ) राजवाडे वगैरे मंडळी पूर्वी तंजावरकडे गेली होती त्यांना ही माहिती कशी मिळाली नाहीं व आतांच ती कशी पुढें येत आहे ?

( ४ ) नाथांच्या प्राचीन चरित्रकारांपैकीं एकालाहि नाथांना उमा नांवाची तिसरी मुलगी असल्याचें माहींत नाहीं हें कसें ?

( ५ ) यावरून नाथांशी संबंध जोडण्याचा कोणाचा तरी हव्यास त्याच्या मुळाशीं दिसतो.

याप्रमाणें त्यांनी आक्षेप घेतले. या आक्षेपानंतर डॉ. तुळपुळेंनीं सविस्तर व साधार उत्तर द्यावयास पाहिजे होतें. तें त्यांनी दिलें नाहीं अथवा त्यांनीं असें तरी म्हणावयास पाहिजे होतें कीं आपला उद्देश तंजावरकडील माहिती इकडील संशोधकांना ज्ञात करून देणें एवढाच होता, मग त्यांत ग्राह्यांश असेल तो ठरेलच. परंतु उलट नुकतेंच जुलै १९५८ मध्यें त्यांनी प्रसिद्ध केलेल्या माधवस्वामीकृत योगवासिष्ठाच्या प्रस्तावनेंत तेंच आपलें पूर्वीचें मत त्याच भाषेंत पुन्हां मांडलें आहे. फक्त प्रस्तावना पृ. २७ मध्यें तळटीपेंत "परंतु हा संबंध विवाद्य असून या वादाची सविस्तर चर्चा कै. पंगू यांनी विराटपर्वाच्या प्रस्तावनेंत केली आहे" असें लिहून ठेविलें आहे. योगवासिष्ठाच्या प्रस्तावनेंत या प्रश्नाबाबतची आपली भूमिका मांडून पंगूंचीं मतें खोडून काढावयाची संधि होती. पण तसें न करतां तळटीपेंत फक्त वरीलप्रमाणें मोघम उल्लेख करून मुख्य प्रश्नाची सर्वांगीण चर्चा करण्याचें त्यांनी टाळलें आहे. परंतु त्यांच्या लेखाचा एकंदर कल पाहतां नाथांना उमा नांवाची तिसरी मुलगी होती व तिचाच दुसरा मुलगा माधवस्वामी हेंच त्यांना खात्रीपूर्वक वाटतें असें दिसतें. शिवाय आपल्या या विषयावरच्या सर्व लिखाणांत ते असेंहि म्हणतात कीं, नाथांच्या दुसऱ्या मुली विषयी कांहीं माहिती मिळत नाही. ही दुसरी मुलगी म्हणजे अर्थात् कर्नाटकांत दिलेली म्हणून जी चरित्र-कार लिहितात ती गंगा तथा गोदा. डॉ. तुळपुळेंनीं उमा ही नाथांची तिसरी मुलगी व माधवस्वामी हे तिचे चिरंजीव व त्यामुळें नाथांचे नातु असें वारंवार लिहिल्यानें या विधानाचा आतां जास्त विचार होणें जरूर आहे. पुनः पुनः तीच ती गोष्ट लिहित गेल्यानें खरीच वाटण्याचा धोका असतो. संशोधनहि त्यास अपवाद नाहीं. असो.

प्रथमतः नाथांच्या दुसऱ्या मुलीविषयीं कांहींच माहिती मिळत नाहीं असें जें डॉ. तुळपुळे जुलै १९५८ मध्यें सुद्धां लिहितात त्याचा थोडा विचार करूं. डॉ. तुळपुळेंनीं महाराष्ट्र सारस्वताच्या चौथ्या आवृत्तीचें शके १८७३ मध्यें संपादन केलें आहे. त्याच आवृत्ती-च्या पान ५११ ते ५१३ वर त्यांना नाथांच्या या मुलीविषयीं कांहीं माहिती मिळाली असती. त्याच प्रमाणें कै. राजवाडेंच्या शके १८३३ मधील ( भा. इ. सं. मं. इतिवृत्त ) गीताचंद्रिके वरील लेख, कै. पांगार-करांच्या एकनाथ तुकाराम काल या खंडातील पान २३८ ते २४१ मधील गंगा अथवा गोदा ( सासरचें नांव ) तिचा जावई पूर्णानंद व नातू शिवराम यांचें बद्दलची दिलेली माहिती, वगैरेकडे डॉ. तुळपुळेंनी लक्ष दिलें असतें तर नाथांच्या दुसऱ्या मुलींविषयीं त्यांना बरीच माहिती मिळाली असती. निरनिराळ्या लेखांतील सर्व माहितीचा सारांश हा :- नाथांची दुसरी मुलगी गंगा ही कर्नाटकांत गदग जवळील डंबळ गांवीं बाळकृष्णपंत चंद्रकेत यांना दिली होती. तिचा मुलगा पुंडाजी. मुलगी लक्ष्मी ही गुलबुर्ग्यांजवळील









महागांवच्या नारायणांस दिली होती. हेच नारायण पुढें पूर्णानंद या नांवानें प्रसिद्धीस आले. यांचे शिष्य परंपरेंत रंगनाथस्वामी निगडीकर, श्रीधरस्वामी नाझरे-कर वगैरे येतात. यांचा मुलगा व शिष्य शिवराम पूर्णानंद. या शिवाय पूर्णानंदाचा कल्याणी (बीदर जिल्हा) येथें मठ असून त्याचा वंश व शिष्य परंपरा अजून चालूं आहे. या कल्याणी येथील मठांत शंभरावर ग्रंथ (अर्थात शिवराम पूर्णानंदानी लिहिलेले) व्यवस्थित ठेवले असल्याचें म. सा. पुरवणी पान ९९० वर नमुद आहे. याच शिवरामाच्या संग्रहांतील ज्ञानेश्वरीची प्रत म्हणजे राजवाडेनां बीडमधील पटांगणांत मिळालेली प्रत होय व तीच नाथांनी शुद्ध केलेल्या प्रतीची प्रत आहे असें मी १ जून १९५८ रोजीं भा. इ. सं. मंडळांत वाचलेल्या निबंधांत दाखविलें आहे. हा निबंध प्रसादच्या जुलै १९५८ च्या अंकांत प्रसिद्ध झाला आहे. असो. वरील माहितीवरून श्री. चिं. ग. कर्वेनीं केलेला तर्क, कीं ही गंगाच तंजावरचें नागनाथांना दिली होती तो, चुकीचा ठरतो.

आतां आपण नाथांना उमा नांवाची तिसरी मुलगी होती काय या मुख्य प्रश्नाकडे वळूं.

तंजावर कडील मराठी कवीमध्यें माधवस्वामींची काव्यरचना फार अफाट आहे. दासोपंतांच्या खालो-खाल यांचाच क्रमांक लागेल. यांची कविता दीड लाखाचे वर भरेल. माधवस्वामींनीं सर्वांत मोठा ग्रंथ रचला तो भारत या ग्रंथाचे लेखनास त्यानी आश्विन व. ३ शके १६२५ ला सुरुवात करून तो कार्तिक वद्य २ शके १६२९ रोजी लिहून संपविला. हें भारत ९२६ अध्यायांचें व ८८२७४ ओव्यांचें आहे. फक्त चार वर्षें व एक महिना इतक्या अवधींत हा एवढा प्रचंड ग्रंथ लिहून पूर्ण केला. आदिपर्वाचे लेखनांस आश्विन वद्य ३ रोजीं सुरुवात केली. ६१४५ ओंव्यांचें तें पर्व मार्गशीर्ष व. ५ रोजी पूर्ण केलें. म्हणजे केवळ २ महिने २ दिवस ६१४५ ओंव्यांचे लेखनास लागले. सभापर्वाचेंहि तसेंच. तें ३०८१ ओंव्यांचें पर्व फक्त १ महिना १० दिवसांत लिहून झालें. जवळ जवळ याच गतीनें त्यांनीं सर्व भारत लिहिलें. ही लेखनाची गति ध्यानांत घेतां त्यानी तें वयाच्या फार तर ६० व्या वर्षी पूर्ण केलें असेल. कदाचित त्याहूनहि आधीं म्हणजे ५५ व्या वर्षींच पूर्ण केलें असावें. पण आपण ६० व्या वर्षींच पूर्ण झालें असें धरून चालूं. इतर ग्रंथकारांचे लेखनाकडे लक्ष दिल्यास त्यांचें महत्वाचें व विस्तृत- अर्थात् माधवस्वामींचा विस्तृतपणा फारच आहे. - लेखन साठीच्या आंतच झालेलें दिसेल. तेव्हां माधवस्वामीनीं वयाच्या ६० व्या वर्षी या भारताचें लेखन केलें असें धरण्यांस कांहींच हरकत असूं नये. यावरून हिशोब करित मागें जातां माधवस्वामींचा जन्म शके १५६९-७० चा ठरतो. नाथ महाराज शके १५२१ अखेरीस समाधिस्त झाल्याचें सर्वमान्य आहे. नाथांच्या निर्याणानंतर ४८-४९ वर्षांनीं माधव-स्वामींचा जन्म झाला असें गणीतानें येतें. नाथांचें निर्याणाचे वर्षीच उमा जन्मली असें धरलें तर तिच्या ४८-४९ व्या वर्षींच माधवस्वामी जन्मले असें होतें. नाथांचे निर्याण समयीं नाथांचें वय व विशेषतः त्यांच्या पत्नि गिरिजाबाईचें वय काय होतें हेंहि पाहिलें पाहिजे. नाथ शके १४५४-५५ सालीं जन्मले असें धरल्यास, व पुष्कळ आधुनिकचरित्रकारांना हाच काल मान्य आहे. - उमा जन्मली त्यावर्षी नाथ ६६-६७ वर्षांचे होते. नाथांचा विवाह शके १४७८ चे सुमारास झाला असें मी समजतों. प्रतिष्ठान चरित्राप्रमाणें पाहतां नाथांच्या १४ व्या वर्षींच त्यांचा विवाह झाला असें समजावें लागतें. नाथांच्या विवाहसमयी- शके १४७८ मध्यें- गिरिजाबाईचें वय १० वर्षापेक्षां जास्त असणें शक्य नाहीं. कारण तो काल मुलींचीं लग्नें ५ व्या ते ८ व्या वर्षांपर्यंत होण्याचा होता. याप्रमाणें पाहतां गिरिजाबाईचा जन्म शके १४६८ च्या सुमारास होतो. गिरिजाबाईना उमा नाथांचे निर्याणाचे वर्षींच झाली असें धरल्यास त्यांचें वय माधवस्वामींच्या जन्माचे वेळीं ५३ वर्षांचें असणें भाग आहे. आतां या वयांत सर्वसाधारणपणें स्त्रियाना मूल होईल काय हा प्रश्न आहे. पण असा कांहीं चमत्कार घडलाच असता तर चमत्कारावरच भर देऊन चरित्र लिहिणारे प्राचीन चरित्रकार या घटने भोंवती एखादी मोठी आख्यायिका सजवून या गोष्टीचा चरित्रांत अवश्य समावेश करते. अशा तऱ्हेचा किंचित् सुद्धां उल्लेख एकाहि चरित्रकारानें केला नाहीं हें ध्यानांत घेण्याजोगें आहे. राजाराम प्रासादी हे स्वतः रामदासी व माधवस्वामीहि रामदासीसांप्रदायी असा कांही चम-








त्कार घडून माधवस्वामीच्या मातेचा जन्म झाला असता व स्वतः माधवस्वामी सुद्धां उमेच्या वयाच्या ४८-४९ व्या वर्षी जन्मले असते तर दुहेरी चमत्काराचें स्वरूप मोठ्या मजेदारपणें रंगविते. शिवाय या सर्व गोष्टी नाथांच्याशीं संबंधित म्हणून त्यांना माहीत असल्या तर त्या भक्तमंजिरींत समाविष्ट केल्याशिवाय राहतेना.

शिवाय आणखी एका समस्येकडे लक्ष दिलें पाहिजे. ती समस्या म्हणजे गिरिजाबाईंचें आयुर्मान. कोणताहि प्राचीन चरित्रकार नाथांच्या निर्याण समयीं गिरिजाबाई हयात असल्याचें सूचित करित नाहीं. त्यावरून नाथांच्या अगोदर कांही वर्षे त्या निवर्तल्या असाव्या अशी दाट शंका येते. विशेषतः हरिपंडित रागावून काशीस निघून गेल्यावर व नाथांनीं काशीस जाऊन त्यास परत आणल्यावर नाथांच्या आयुष्यांतील जे प्रसंग नमूद आहेत त्यामध्यें कोठेंहि गिरिजाबाईंचा उल्लेख नाहीं. काशीस गेल्यावेळीं नाथ हरिपंडितास म्हणतात :—

" उरलें आयुष्य तुझे संगतीं।
क्रमावें ऐसा हेत चित्तीं।
तुजविण न गमे येथें निश्चिती।
वाटतसे खंती चित्तांत ॥ ७९/२३
तूं तरी सत्पुत्र एकुलता एक।
आम्हांसि जोड नसेचि आणिक।
आता प्रतिष्ठानासि येता देख।
वाढेल लौकिक बहुत तेणें। " ८०/२३

— (भक्तलीलामृत महिपति)

– गिरिजाबाई हयात असत्या तर नाथ त्या करीत असलेल्या शोकाचें स्वरूप हरिपंडितांस सांगते. पण ते गिरिजाबाईबद्दल कांहींहि सांगत नाहींत. यावरून माझी कल्पना आहे कीं एकुलता एक मुलगा हरिपंडित रागावून काशीस गेल्याचे दुःखानें गिरिजाबाईंनीं इहलोकची यात्रा संपविली असावी. ही घटना शके १५१४-१५ चे सुमारास घडली असावी. असें जर घडलें असेल तर आणखी नव्या अडचणी निर्माण होतात. याशिवाय अत्यंत महत्त्वाची गोष्ट म्हणजे खुद्द माधवस्वामी एकनाथ महाराजांच्या उमेविषयीं व त्यांचा नाथांशीं समजले गेलेल्या नात्याविषयीं चकार शब्द काढीत नाहींत. समजला जातो तसा त्यांचा संबंध असता तर मुक्तेश्वर व शिवराम पूर्णानंदांनीं साभिमानानें आपल्या नाथांशीं असलेल्या नात्याचे जसे आपल्या काव्यांत उल्लेख केले आहेत तसे माधवस्वामीहि जरूर करते. पण माधवस्वामींनीं आपल्या एकाहि ग्रंथांत नाथमहाराज आपले आजोबा असें सूचित केल्याचें आढळून येत नाहीं. अशी कांहीं सूचना जरी असती तरी डॉ. तुळपुळे आपल्या लेखांत साक्षेपानें निर्देश करते. माधवस्वामीनंतर त्यांचा मुलगा जो रामपंडित तोहि आपल्या ग्रंथांत लिहित नाहीं कीं, एकनाथ महाराज आपले पणजोबा. याचें कारणहि उघड आहे कीं, नाथ महाराज आपले आजोबा नसल्याचें माधवस्वामींना माहीत होतें.

उमा ही नाथांची तिसरी मुलगी म्हणण्याला जो काय तुटपुंजा आधार आहे तो माधवस्वामींचा नातु वासुदेव आपल्या नवम स्कंधांत व अष्टम स्कंधांत एकनाथ या नांवाचा उच्चार करतो तो :

" तयाची ( कृष्णाची ) दिव्य मंगलमूर्ती।
कन्यादान समयी अति प्रीति।
अर्पिता होय नागनाथा प्रति।
भावें निश्चिति एकनाथ ॥ "

– ( नवम स्कंध भागवत )

जेणे येकादशाचे विवरण।
केलें महाराष्ट्रभाषे करुन।
तो अस्मत्कुल भुषण। – ( अष्टम स्कंध )

वरील ओव्या हाच काय तो एकंदर आधार. या ओव्या वासुदेवानें शके १७१६ व नंतर लिहिलेल्या आहेत. म्हणजे नाथांच्या नंतर जवळजवळ दोनशे वर्षांनीं या ओव्या लिहिल्या गेल्या. ज्याअर्थी स्वतः माधवस्वामी कांहीं लिहित नाहींत. पण त्यांचा नातु मात्र लिहितो त्याअर्थी नांवाचा घोटाळा म्हणजे दोन निरनिराळ्या एकनाथांची एकत्र व तेहि प्रसिद्ध एकनाथ महाराज म्हणून गल्लत झालेली असावी. एकनाथ हेंच नांव असणाऱ्या व नाथांच्या रक्तसंबंधाच्या व्यक्तीनें आपली कन्या उमा नागनाथांस दिली असावी. माधवस्वामींनीं एकनाथांचा उच्चार आपल्या ग्रंथांत कां केला नसावा हें वर सांगितलेंच आहे. परंतु पुढील शंभर वर्षांत नांवाचा सारखेपणा व ऐकीव माहिती यांच्या गोंधळांत हा साधा पण कदाचित् नाथांशीं रक्तानें संबंधीत एकनाथ प्रसिद्ध नाथ महा-

राजांशीं एकरूप केला गेला व त्याची नोंद आपल्या भागवतांत वासुदेवानें केली या संभाव्य घोंटाळयाची नीट छाननी न करतां, कालदृष्ट्याहि विशेष खोल विचार न करतां तो धागा डॉ. तुळपुळेनी उचलला. विशेषतः वयाच्या ५३–५४ व्या वर्षीं एकीला व ४८–४९ व्या वर्षीं दुसरीला, अपत्य संभवाचा साधारणतः अशक्य असलेला प्रसंग त्यांनी आणून ठेविला. या सर्वांचा सखोल अभ्यास न करतांच कांहीं नवीन माहिती मिळतांच ती खरी व पूर्णतया विश्वासार्ह मानून कांहीं संशोधकानीं मुक्तेश्वरास तंजावर प्रांतीं या आपल्या तथाकथित मावशीकडे रहावयास नेलें. मुक्तेश्वराच्या काव्यांत कर्नाटक प्रांतात रूढ असलेले खेळ त्यांचीं नांवें व इतर कांहीं शब्द आढळतात. यांचें कारण तो आपली मावशी डंबळची गोदा इजकडे रहावयास गेला असला पाहिजे. तंजावरकडील उमेकडे नव्हे असो.

एकनाथ नांवाचा घोंटाळा झाल्यानें कांहीं सिद्धांत काढले गेले हें वर सांगितलेंच आहे. आतां आपणांस याचा उलगडा होण्याजोगें कांहीं संभाव्य स्थान असेल काय तें पाहूं. अर्थात हा उलगडा तर्काधिष्ठित आहे. यांस लेखी असा पुरावा नाहीं. हें प्रथमच सांगून टाकलेलें बरें. पण बऱ्याच संशोधनानंतर पुढें मी दाखविणार असलेला संभव खरा ठरणारच नाहीं असें मात्र नाहीं. उलट खरें ठरणेंच शक्य आहे म्हणून संशोधनाची एक दिशा म्हणूनच केवळ ती येथें नमूद करून ठेवितो.

नाथांना परंपरेप्रमाणें व सर्व प्राचीन चरित्रकारांच्या मताप्रमाणें फक्त दोन मुली. एक मुक्तेश्वराची आई व दुसरी डंबळास दिलेली गंगा तथा गोदा. मुक्तेश्वराचा वंशवृक्ष प्रसिद्ध झाला आहे. त्यांत शके १५७० पर्यंत एकनाथ नांव असलेली व्यक्ति सांपडत नाहीं. नंतर राहतां राहिली गोदा. तिचा वंशवृक्ष प्रसिद्ध झाला नाहीं. हिला पुंडाजी या नांवाचा मुलगा होता असें चरित्रकारानीं दिलें आहे. तिची लक्ष्मी नांवाची मुलगी होती व ती पूर्णानंदाची पत्नी व शिवरामांची आई हें आतां पुराव्यानिशीं सिद्ध झालें आहे. या लक्ष्मीचा जन्म १५१४ चे सुमाराचा येतो. नाथाचे निर्याणानंतर शके १५२२–२३ च्या सुमारास गोदास जो मुलगा झाला असेल त्याचें नांव एकनाथ ठेवलें असावें. तें स्वाभाविकहि आहे. या वेळीं गोदाचें वय ३२–३३ वर्षांचें येतें. हा एकनाथ म्हणजे नाथमहाराजांचा नातू हें स्पष्टच आहे. या एकनाथांस त्याच्या वयाच्या २४–२५ चे सुमारास म्हणजे शके १५४७–४८ त उमा झाली असावी व हीच तंजावर कडील नागनाथांस दिली असावी. हिचाच दुसरा मुलगा माधवस्वामी शके १६६९–७० मध्यें जन्मला हें आपण मागें पाहिलेंच आहे म्हणजे माधवस्वामीच्या जन्माचे वेळीं उमेचें वय २२–२३ वर्षांचें असावें. आतां या सर्व घटना स्वाभाविक आहेत हें उघड दिसत आहे. एकनाथ महाराजांचा नातू एकनाथ ( नाथ महाराज नव्हेत )– याची माहिती माधवस्वामीस असल्यानें त्यानीं एकनाथाचा उच्चार आपले आजोबा म्हणून कोणत्याहि काव्यांत केला नाहीं. व हें साहजिकच आहे. कालांतरानें नांवाच्या सादृश्यानें घोंटाळा निर्माण झाला. व वासुदेवानें जास्त चिकित्सा न करतां, व तो इतक्या चिकित्सेचा कालहि नव्हता, आपल्या काव्यांत मागें लिहिल्याप्रमाणें घालून टाकलें.

सारांश उमा ही नाथमहाराजांची मुलगी नव्हे व माधवस्वामी त्यांचे नातू नव्हेत. शक्यता आहे कीं कर्नाटकांत डंबळ येथें दिलेल्या नाथांच्या दुसऱ्या मुलीच्या नाथांचे निर्याणानंतर झालेल्या एकनाथ हेंच नांव असलेल्या मुलाची मुलगी उमा. ही नागनाथास दिली व तिचाच मुलगा माधवस्वामी. कालक्रम संगति व स्वाभाविकपणा या दृष्टीनें हा तर्क बरोबर दिसतो.

माझी भूमिका अनाग्रही आहे. मला जें जास्तींत जास्त शक्य वाटतें तें आपल्यापुढें विचारार्थ ठेविलें आहे. याचा योग्य विचार व्हावा एवढीच इच्छा. *

---

* भा. इ. सं. मंडळाच्या ४६ व्या संमेलनांत दि. ३१-५-५९ रोजी वाचलेला निबंध.










## पुस्तक-परामर्श –

**आवड-निवड**–ले. प्रा. स. गं. मालशे प्रकाशक : मॅजेस्टिक बुक स्टॉल, मुंबई ४. मूल्य, पांच रुपये.

आवड-निवड या लेख-संग्रहांत प्रा. स. गं. मालशे यांनीं लिहिलेल्या विविध टीका-लेखांचा समावेश केला आहे. विनोदाच्या स्वरूपाविषयी तात्त्विक चिकित्सा व मराठी विनोदाची परंपरा या विषयावरले दोन लेख, लघुकथेच्या कालच्या आणि आजच्या स्वरूपाची तौलनिक चर्चा, य. गो. जोशी व व्यंकटेश माडगूळकर यांचीं वैशिष्ट्यें दर्शविणारे असे लघुकथा-विषयांची चिकित्सा करणारे तीन लेख, सावरकरांची कविता व सावरकरांचें वक्तृत्व यावर दोन लेख, याचप्रमाणें काणेकरांची नाटकें, लघुनिबंधकार काणेकरांचें व्यक्तित्व, व प्राध्यापक काणेकर यांविषयीं तीन लेख व पाणकळा कादंबरी व मुक्तेश्वराचें नलोपाख्यान यांवरचे समीक्षणात्मक लेख असे विविध विषयांवरील टीका लेख या संग्रहांत अंतर्भूत केले आहेत. विनोदी वाङ्मय, लघुकथा, कविता, नाटक, कादंबरी अशा विविध वाङ्मय प्रकारांवर लिहितांना टीका-लेखकाची सौंदर्यदृष्टि, वाङ्मयीन मूल्याविषयींची दृष्टि, चिकित्साबुद्धि, त्या त्या विषयाचा व्यासंग इ० गुणांची परीक्षा आपोआपच होत असते.

हास्य-विनोदासंबंधीं केलेली तात्त्विक चर्चा विद्यार्थ्यांना मार्गदर्शक ठरेल अशी आहे. लेखाची कक्षा लहान असल्यामुळें अधिक सखोल व विस्तृत विवेचनाची अपेक्षा करणें वाजवी ठरणार नाहीं. ' मराठी विनोदाची परंपरा ' या लेखांत ज्ञानेश्वरापासून आधुनिक कालापर्यंत निर्माण झालेल्या विनोदी वाङ्मयाचा आढावा घेतला आहे. विविध ठिकाणीं आढळलेलीं विनोद-स्थळें लेखकानें मोठ्या मनोरंजक पद्धतीनें खुलवून मांडलीं आहेत. या ठिकाणीं कालखंडाची कक्षा फार विस्तृत असल्यामुळें व मनोरंजक पद्धतीनें मांडण्याकडे कल राहिल्यामुळें चिकित्सेला हवा तेवढा अवसर मिळालेला नाहीं. नाटकांत आढळणाऱ्या विनोदाचें विवेचनहि याच कारणानें ओझरते उल्लेख करून आवरतें घ्यावें लागलें आहे. ' विनोदी लेखांच्या जोडीनें विनोदी कथांचें विवेचन झालेलें नाहीं ' ही लेखकाची तक्रार रास्त आहे. ती ध्यानांत धरून व ' आवडनिवड ' हें पुस्तक १९५९ मध्यें प्रसिद्ध झालें आहे हें ध्यानांत धरतां श्री. मिरासदारांच्या विनोदी कथांचा उल्लेख या संदर्भात यायला हवा होता. आज " विनोदाची रुंदी वाढत असली तरी त्याची खोली मात्र कमी होत आहे " असा जो निष्कर्षात्मक अभिप्राय प्रा. मालशे यांनीं व्यक्त केला आहे तो महत्त्वपूर्ण आहे.

लघुकथेवरले लेख प्रा. मालशे यांनीं मोठ्या बारकाईनें व मार्मिक चिकित्सा करून लिहिले आहेत. लघुकथा-वाङ्मयाचें परिशीलन समरसतेनें केलें असल्यामुळें व मूल्यविषयक जाणीव सारखी जागरूक ठेवल्यामुळें विवेचनांत जिवंतपणा व सूक्ष्मता यांचा प्रत्यय येतो. " लघुकथा जुनी कीं नवी, या सवालापेक्षां चांगली कीं वाईट, हा सवाल मूलभूत आहे " ही दृष्टि ठेवल्यामुळें केवळ जुन्याची वा नव्याची तरफदारी करण्याचा एकांगीपणा लेखनांत आलेला नाहीं. " दिवाकरकृष्णांचें व्हावें तसें चीज झालें नाहीं " हा लेखकाचा अभिप्राय सार्थ आहे. ' संकष्टी चतुर्थी ' या श्रेष्ठ दर्जाच्या कथेंत मराठी कथेनें प्रगतीचा फार मोठा टप्पा गाठून ठेवला यांत शंका नाहीं. ' पहिला मराठी नवकथाकार ' य. गो. जोशी हा लेख विचार करायला लावणारा आहे. फडके-प्रणीत कथातंत्राच्या पलीकडे जाणें व सूक्ष्म मनोविश्लेषण करणें या कसोट्या प्रामुख्यानें डोळ्यांपुढें ठेऊन य. गो. जोश्यांना नवकथाकार किंवा नवकथाकारांचे पूर्वसूरी ठरविलें आहे. नवकथाकारांनी रचनेचे साचे पार मोडून पाहिले, कथावस्तूविषयींच्या सनातन कल्पना

मोडल्या, परंपरागत चालत आलेली वाक्यरचनेची मांडणी मोडली, सबंध कथा एक प्रतिमा होईल या प्रकारची भावकथा निर्माण केली, नीतीशी व औचित्य विचाराशीं संलग्न असलेली सौंदर्यकल्पना त्यापासून मुक्त करण्याचा प्रयत्न केला. जीवनाकडे बघण्याचा एक लोकविलक्षण दृष्टिकोन गंगाधर गाडगिळांच्या कथांतून व्यक्त झाला. हा सारा बदल हेतुपुरस्सर, अभिनिवेशपूर्वक घडवून आणला गेला आणि त्यानंतर नवकथा ही कल्पना मान्य होऊं शकली. वर उल्लेखलेल्या सर्व गोष्टी य. गो. जोश्यांच्या कथेंत आहेत हें सिद्ध केलें तर पूर्णार्थानें नवकथाकार म्हणून त्यांचा उल्लेख करतां येईल. एरव्ही नाहीं. ‘ ग्रामीण कथाकार माडगुळकर ’ ह्या लेखांत माडगूळकरांच्या वैशिष्ट्यांचें विवेचन मार्मिकपणें केलें गेलें आहे.

‘ सावरकरांचें वक्तृत्व ’ हा छोटा लेख वाचतांना वाचक सावरकरी उच्चारांच्या लकबीनें आपोआप वाचूं लागतो इतका चांगला, जिवंत उतरला आहे. ‘सावरकरांची कविता’ या लेखांत सावरकरांच्या ‘ उपेक्षित ’ काव्याचें रसग्रहणात्मक मूल्यमापन आहे. एखाद्या कवीचें काव्य श्रेष्ठ दर्जाचें असूनहि त्याची उपेक्षा झाली आहे या जाणिवेनें त्याच्या कवितेचें मूल्यमापन करणें ही भूमिका अभिनंदनीय आहे. या दृष्टीनें प्रा. मालशे यांचा प्रयत्न उल्लेखनीय आहे. सावरकरांची कविता विविध कालखंडांत लिहिली गेली असली तरी आज ती साकल्यानें उपलब्ध आहे. तेव्हां सर्व कवितांतून आढळणारें त्यांचें व्यक्तित्व व त्यांची जीवनदृष्टि यांनीं त्यांच्या कवितेच्या आशयाला कसें स्वतंत्रपण प्राप्त करून दिलें व तो आशय कलादृष्ट्या कसा व्यक्तविला गेला, याचें सखोल दर्शन या ठिकाणीं अपेक्षित होतें. तें झालेलें नाहीं. सावरकरांच्या कवितांच्या ताटव्यांतून विहार करून आल्याचें समाधान फक्त लाभतें. या कवितांची काव्य श्रेष्ठत्वाच्या दृष्टीनें चिकित्सा अपेक्षित होती. सावरकरांची कविता राष्ट्रीय घटनांच्या संदर्भांत स्फुरलेली असूनहि ज्या जीवनविषयक चिंतनानें व्यापक बनते त्याचें मर्म येथें विशद व्हावयास हवें होतें. सावरकरांचें ‘ कमला ’ काव्य निर्दोष नाहीं. परंतु कमलाकाव्यांत एक वेगळा प्रयत्न केला गेला आहे. एका मुलीच्या शरीराची व मनाची वाढ होतां होतां ऋतुप्राप्तीची अवस्था, गर्भादान समारंभ, व प्रत्यक्ष संभोग-सुखाच्या वेळची अवस्था यांतून ती कशी जाते याचें चित्रण कमलाकाव्यांत आलेलें आहे. विषयाविष्काराच्या दृष्टीनें ही झेप उल्लेखनीय ठरते. तसेंच सावरकर आपलें कलाविश्व कसें उभें करतात, कलादृष्ट्या ते श्रेष्ठ आहेत कीं नाहींत या प्रश्नाची चर्चा होणें सावरकरांच्या कवितांचें मूल्यमापन करतांना अगदीं अवश्य होतें. सावरकरांच्या कवितेचें श्रेष्ठत्व सिद्ध करणाऱ्या टीकाकारांनीं असे कांहीं मूलभूत प्रश्न धसास लावावयास हवे आहेत.

‘ काणेकरांचीं नाटकें ’ हा लेख तौलनिक व सडेतोड विवेचन करून लिहिला आहे. ‘ प्राध्यापक काणेकर ’ ‘ लघुनिबंधकार काणेकरांचें व्यक्तित्व ’ हे लेख जिव्हाळ्यानें लिहिले आहेत. काणेकरांच्या विनोदी, हजरजबाबी व्यक्तित्वाची प्रतीति येते तशीच प्रा. मालशे यांच्या खेळकर शैलीचा विलासहि या लेखांतून पाहावयास मिळतो. ‘ पाणकळा ’ कादंबरीचें परीक्षण सामान्य वाचकास धक्का देणारें वाटलें तरी निकषावर बोट ठेऊन व निर्भीडपणें लिहिलेलें आहे. मुक्तेश्वराच्या नलोपाख्यानाचें रसग्रहण विस्कळीत वाटतें.

प्रा० मालशे यांच्या शैलीचा आवर्जून उल्लेख करायला हवा. या शैलीच्या प्रसन्नतेमुळें लेखांतील टीकात्मक विवेचन अधिक आल्हाददायक बनतें. अनेक विषयांची विस्तृत चर्चा या पुस्तकांत झालेली असल्यानें तें विद्यार्थ्यांना वेळोवेळीं उपयोगी पडेल यांत शंका नाहीं.

— शंकर वि. वैद्य

**चांदणें**— लेखक : सदानंद रेगे. प्रकाशक : पॉप्युलर बुक डेपो. मुंबई ७, किंमत : ४ रुपये.

श्री. सदानंद रेगे हे एक चांगल्यापैकीं कवि आणि लघुकथा-लेखक म्हणून प्रसिद्ध आहेत. कल्पकता हा रेगे यांच्या व्यक्तिमत्त्वाचा व लेखनाचा एक असाधारण विशेष आहे. या कल्पकतेमुळें प्रत्यक्ष जीवनांतले अनुभव कांहीं अलौकिक सौंदर्य प्राप्त करून घेऊन त्यांच्या लेखनांत व्यक्त होतात. त्यांच्या लेखनांत नावीन्याचा व ताजेपणाचा प्रत्यय येतो तो या कल्पकतेमुळेंच. गद्याच्या प्रांतांत चुकतमाकत येणाऱ्या उपमा-दृष्टांताच्या पलीकडे जाऊन सबंध कथाच्या कथा काव्यमय शैलीनें सौंदर्यपूर्ण करणाऱ्या कांहीं मोजक्या लेखकांत श्री. रेगे यांचा अंतर्भाव करावा लागतो. वेगवेगळ्या प्रकारचे अनुभव वेगवेगळ्या पद्धतींनीं मांडण्याचे प्रयोग करीत राहिल्यामुळें श्री. रेगे यांच्या नांवाभोवतीं जुनेपणाची धूळ अजून तरी सांचली नाहीं. त्यांच्या लेखनाचीं विविध वैशिष्ट्यें त्यांच्या चांदणें या संग्रहांत प्रत्ययास येतात.

कथावस्तूंतच कांहीं लोकविलक्षणपणा असावा व रेगे यांच्या काव्यात्म दृष्टीनें त्याला सौंदर्य प्राप्त व्हावें याचा प्रत्यय 'चांदणें' आणि 'सीझरचें रक्त' या कथांत येतो. रानावरील चांदण्याचा मादकपणा वाढत वाढत राखण करणाऱ्या कुत्र्याच्या मनांत विकार कसे निर्माण होतात व कोल्हीशीं प्रणय-क्रीडा करण्यांत तो कसा धुंद होतो हें नावीन्यपूर्ण कथाबीज औचित्याला धक्का न लावतां रेगे यांनीं फुलवलें आहे. 'सीझरचें रक्त' अरबांच्या, पिरामीडच्या देशांत आपणांस घेऊन जातें. मध्यरात्रीं त्या पिरामीड मधून क्लिओपात्रा बाहेर येते. तिचें नाक कापलेलें असतें. तिनें दिलेला हिरा सीझरच्या रक्तांत बुडवून आणला कीं तिचें नाक परत नीट होणार असतें. कथेंत निर्माण केलेलें अद्भुतरम्य वातावरण कथा-सौंदर्याचा महत्त्वाचा घटक मानावा लागेल. परंतु कथेच्या प्रारंभीं आणि उत्तरार्धांत येणारें छापखान्याच्या खडखडाटाचें जें वातावरण आहे तें या ठिकाणीं कथेच्या मुख्य सौंदर्याला बाधकच ठरलें आहे. 'अश्वमेधाचा घोडा' याहि कथेच्या घडणींत अद्भुतरम्यता आहेच. एका बाईच्या खुनाचें रहस्य दडवून ठेवण्यासाठीं घेतलेले पांच हजार रुपये माणूस मरणानंतर भुताच्या रूपानें येऊन देऊन जातो. कथाबीज अगदीं नावीन्यपूर्ण नसलें तरी उत्कंठावर्धक आहे. शेवटच्या वाक्यानें मिळणारा धक्का प्रकर्षानें मनावर ठसेल आणि सबंध कथावस्तु एका वेगळ्या अर्थानें उजळून टाकील अशा पद्धतीनें कथेची मांडणी होणें अवश्य होतें. "थडग्यांचा आक्रोश" हें कथाशीर्षकच वरील कथांशीं असलेलें आपलें नातें स्पष्ट करणारें आहे. रेल्वे पार्सलांत आलेली कवटी खून झालेल्या माणसाचीच असावी, ती शोधल्याबद्दल आपल्याला बक्षीस मिळेल या आनंदांत कारकून असतांना कळून येतें कीं ती कवटी एका जादूगाराच्या मालकीची आहे. माणूस मेल्याच्या दुःखापेक्षां पांचहजार रुपयांचें बक्षीस गेलें याचेंच दुःख मानणाऱ्या मानवी स्वभावावर सूचकपणें टीका होते. कथेंतील वातावरणाला भूतकथेच्या वातावरणासारखी डूब दिली नसती तरी चालण्यासारखें होतें.

रेनकोट, बॅट, प्रतिष्ठा या कथा जरा वेगळ्या धर्तीच्या. लहान मुलांच्या मनामध्यें असलेलें आशा-आकांक्षांचें जग, व त्याला विरोधी असणारा कठोर व्यवहार यांतील सूचक संघर्षांतून या कथा जिवंत होतात. 'रेनकोट'मधला शरद, 'बॅट'मधला रामू, व 'प्रतिष्ठा'मधला चांभाराचा मुलगा यांच्या अंतःकरणांतलीं सूक्ष्म आंदोलनें जाणवावींत अशा रीतीनें घटनांचें संयोजन झालें आहे. त्यांचें मनोविश्लेषण जमलें आहे. अशा कथांचीं कथाबीजें लहान असलीं तरी त्यांना खोली प्राप्त करून देण्यांत रेगे यांना यश लाभलेलें आहे. कथा हृदयस्पर्शी आहेत.

ग्रामीण वातावरणाच्या पार्श्वभूमीवर घडणाऱ्या 'बागेसरीच्या द्रोणींत', 'दरोडा' या कथा वाचनीय आहेत. 'मिशा' या कथेंत हास्य व कारुण्य यांचें मनोरंजक मिश्रण आहे. 'बातमी' ही कथा आकारानें छोटी पण मोठा आशय सूचित करणारी आहे.

श्री. सदानंद रेगे यांच्या शैलींत एक प्रकारची सहजता आहे. ही शैली विविध प्रकारच्या वातावरणांतून वाचकाला लीलेनें फिरवून आणते. "चंद्र उगवला. आकाशाला चांदव्याला किनखापी लागल्या....








खाडीच्या पाण्यावर कलाबुतीचा चकचकाट झाला... सावल्यांची कबुतरं पावलांच्या मिनारांत पंख मिटून निजलीं " ( चांदणें ) " नक्षत्रांचे ठिपके असलेला अंधाराचा चित्ता चोरपावलांनीं आला ... " (रेनकोट) " निळी पहाट वितळली नि तिच्या रसरंगांत कोवळ्या सकाळचे सोनेरी गुलाब डुंबू लागले. पहाट-वाऱ्याची ती हिरवी झुळुक केशराच्या मळ्यांत आली... " ( सुनो मोरे पपीयरा ) " कल्हई लावलेल्या भांड्यासारखं आभाळ लख्ख होतं.... अन् आतां तर तें काळ्याकुट्ट ढगांनीं इतकं डवरून गेलं होतं कीं, नुसती टिचकी मारली असती तरी मुसळधार सरी कोसळूं लागल्या असत्या. ( बागेसरीच्या द्रोणींत ) अशीं वर्णनें कथांच्या भोंवतीं मनोहर वातावरण निर्माण करतात, कथांची गोडी वाढवतात, व विशिष्ट भाववृत्ति निर्माण करण्यास साहाय्यभूत होतात.

श्री. सदानंद रेगे यांनीं " वेगवेगळ्या प्रकारची, आशयाची, घाटाची कथा लिहिली आहे " " कथेंतील कथा नाहिशी होत चालल्याची तक्रार निदान रेगे यांच्या कथालेखनाबाबत तरी खरी नाही " अशा अर्थाचा जो अभिप्राय संग्रहाच्या वेष्ठनावर नमूद केला आहे त्याचा प्रत्यय 'चांदणें' कथासंग्रह वाचतांना येतो.

— शंकर वि. वैद्य

---

* मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारें महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणें, हें या मासिकाचें ध्येय व उद्दिष्ट आहे.
* या मासिकांत येणाऱ्या लेखांत कोणत्याहि विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतु नाहीं.
* मासिकांत प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणांत सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.








## प्राज्ञपाठशाळामंडळ ग्रंथमाला

| | | |
|---|---|---|
| (१) धर्मकोश – व्यवहारकाण्ड भाग १ ते ३ | | किंमत |
| | साधी बांधणी ... ... ... | ५२–०–० |
| | कापडी बांधणी ... ... ... | ६४–०–० |
| (२) धर्मकोश – उपनिषत्काण्ड भाग १ ते ४ | | |
| | साधी बांधणी ... ... ... | ११०–०–० |
| | कापडी बांधणी ... ... ... | १२६–०–० |
| (३) धर्मकोश – संस्कारकाण्ड भाग १ ला | | ४५–०–० |
| (४) मीमांसादर्शन ... ... ... ... | | ३०–०–० |
| (५) मीमांसाकोश ... भाग १ ते ४ | | १३५–०–० |
| (६) कौषीतकिब्राह्मणारण्यकविषयकोश ... ... | | ६–०–० |
| (७) हिंदुधर्माची समीक्षा (लक्ष्मणशास्त्री जोशी) ... | | ५–०–० |
| (८) वैदिक संस्कृतीचा विकास ... .. ... | | ६–०–० |
| (९) नवमानवतावाद ... ... ... ... | | २–८–० |
| (१०) मानवाचा आदर्श ... ... ... ... | | ३–०–० |
| (११) चार्वाक – इतिहास आणि तत्त्वज्ञान (प्रा. सदाशिव आठवले) ... ... | | ३–०–० |
| (१२) गीता-प्रवेश (डॉ. गो. वि. देवस्थळी) ... | | २–८–० |



अल्प बचत योजनेंत
तुम्ही पैसे गुंतविणें
म्हणजे
राष्ट्राला मदत करणें व
आपलें भवितव्य सुरक्षित करणें होय.




अल्प बचत योजना ही प्रत्येक व्यक्तीसाठीं आहे आणि या योजनेंत पैसा गुंतविणारा प्रत्येक इसम केवळ आपला पैसा सरकारी रोख्यांत गुंतवीत नाहीं तर तो राष्ट्र-उभारणीच्या कार्यांत सहभागी होत असतो. भारताची प्रगति मूठभर व्यक्तींवर अवलंबून नसून श्रम करून आणि बचत करून या महान कार्यांतील आपला वांटा उचलणाऱ्या बहुजन समाजावर ती अवलंबून आहे. नवभारत निर्मितीच्या ह्या प्रचंड कार्यास हातभार लावण्याचा मान आपल्याला मिळाला आहे याबद्दल प्रत्येकास अभिमान वाटला पाहिजे.



या योजनेंत पुढील प्रकारांनीं पैसा गुंतविता येईल (१) पांच रुपये किंवा पांचाच्या पटीतील रकमेइतकी, १२ वर्षे मुदतीची नॅशनल सेव्हिंग सर्टिफिकिटें विकत घेऊन (२) १०० रु. आणि त्याच्या पटीतील रकमेइतकी १० वर्षांच्या मुदतीची ट्रेझरी सेव्हिंग डिपॉझिटें घेऊन. (३) पोस्टांत खातें उघडून किंवा/आणि (४) १५ वर्षे मुदतीची ॲन्युइटी विकत घेऊन.

सविस्तर माहितीसाठीं नजिकच्या पोस्ट ऑफिसांत, जिल्ह्याच्या अव्वल कारकुनाकडे किंवा तुमच्या विभागांतील रीजनल सेव्हिंग्ज् ऑफिसच्या कोणत्याहि अधिकाऱ्याकडे चौकशी करा.

# अल्प बचत योजनेंत पैसे गुंतवा.

मुंबई सरकारच्या प्रसिध्दी खात्यातर्फे प्रकाशित